पूर्वपाकिस्तानांतील

# विनोबांची प्रेमयात्रा


चारु चौधुरी

अनुवादक :

बा. ज. कुंटे





परंधाम प्रकाशन, पवनार

'प्रेमयात्रा' चारु चौधरी यांच्या "पूर्व पाकिस्ताने विनोबाजीर प्रेम यात्रा" च्या आधाराने अनुदित केलेले पुस्तक आहे.

ता. ५ सप्टेंबर ते २१ सप्टेंबर पर्यंत सोळा दिवस विनोबाजींची भूदान पद-यात्रा पूर्वपाकिस्तानात झाली. यात्रेंत त्याना १७५ बिघे जमीन आणि जनतेचे अलोट प्रेम मिळाले.

गांधीजींच्या नोआखलीत झालेल्या शांति-कार्यात त्यांच्या बरोबर चारु चौधरी आणि त्यांचे अनेक सहकारी होते. ते सर्वजण विनोबांच्या या भूदान पद-यात्रेंत सामिल होते. चारुदांनी लिहिलेल्या या पुस्तकावरून या 'प्रेम-यात्रेचें' स्पष्टसें चित्र आपणापुढे उभें राहत आहे.

जनता, ती पूर्वपाकिस्तानात असो की भारतात असो, एका च तत्वाची व सत्वाची बनलेली आहे. भूदान विचाराविषयी आणि विनोबाविषयी दोन्ही देशातील जनतेनें अत्यंत आपुलकीनें विचार केला आहे आणि आपला जिव्हाळा प्रगट केला आहे. जनतेची ही श्रद्धा आणि मंगल भविष्याविषयींची तिची ही आशा च जागतिक एकत्वाची आणि कल्याणाची ग्वाही आहे.

चारु चौधरींच्या या पुस्तकानें ही श्रद्धा आणि आशा बळकट होईल 'प्रेमयात्रे'चें हें प्रकाशन त्या कामी साह्यभूत ठरो, अशी अभिलाषा आम्ही बाळगीत आहो. मूळ बंगाली पुस्तकाचा अनुवाद वा. ज. कुटे यांनी केला आहे. त्यांचे आणि पुस्तक प्रकाशन करण्याच्या कामात आम्हाला साह्य करणाऱ्या आमच्या अनेक मित्रांचे आम्ही आभारी आहो

—प्रकाशक

# अनुक्रमणिका

## पूर्व पाकिस्तानांतील

# विनोबांची प्रेमयात्रा

## प्रारंभिक

ता० १ किंवा २ ऑगस्ट रोजी वर्तमानपत्रात वाचले की कलकत्त्याला पत्रकाराच्या पुढें बोलताना पंडित जवाहरलाल नेहरू यांनी सांगितले की, "पाकिस्तान सरकारनें आचार्य विनोबांना आसामातून पश्चिम बंगालकडे येताना पूर्व पाकिस्तानामधून जाण्याची परवानगी दिली आहे. यामुळें पूर्व पाकिस्तानात विनोबांची सुमारे दोन आठवडे पदयाना होण्याचा संभव आहे." याच संदर्भात बोलताना पंडीतजी पुढें म्हणाले–"विनोबांची पूर्व पाकिस्तानातून होणारी ही पदयात्रा थोड्या दिवसांपुरती असली तरी उभय देशामध्यें सौहार्द (मैत्री) स्थापन करण्यास सहायक होईल"

हें वृत्त प्रसृत झाल्यानंतर पश्चिम पाकिस्तानातील वर्तमानपत्रातून विनोबांच्या पूर्व पाकिस्तानातील प्रवेशाला सरकारनें परवानगी दिल्याबद्दल प्रखर विरोध दाखविण्यात आला त्याच्या उत्तरात पाकिस्तानचे परराष्ट्र मंत्री जनाब महमद अली यांनी सांगितले की, "केवळ मानवतेच्या दृष्टीनें च विनोबांना पूर्व पाकिस्तानातून जाण्याची परवानगी देण्यात आली असून ह्या गोष्टीचे केवळ भारतातच नव्हे तर साऱ्या जगात अभिनंदन करण्यात आले आहे या शिवाय विनोबाजी हे आपल्या पदयात्रेच्या गावी केवळ शुभेच्छेचाच प्रचार करतील आणि त्यामुळें उभय देशात मैत्री स्थापन होण्यास मदत होईल. आम्ही तर भारताशी बंधुत्वपूर्ण संबंध राखू इच्छितो"

वर्तमानपत्रात हें वृत्त वाचल्यानंतर विनोबा पूर्व पाकिस्तानात निश्चित च येणार अशी आमची खात्री झाली आणि या पदयात्रेविषयी आमचे कर्तव्य काय याचा आम्ही विचार करू लागलो विनोबांच्या

पदयात्रेचा कार्यक्रम कसा असावा, त्याची व्यवस्था कशी करावी याविषयीं आमच्या कलकत्यातील स्नेह्याकडे विचारणा केली आणि स्थानिक मित्रांना या कामात शक्य ते साहाय्य करण्याबद्दल लिहिले. एवढ्यात प० बंगालच्या सर्वोदय मंडळाचे संयोजक श्रद्धेय श्री चारुचंद्र भंडारी यांचे पुढीलप्रमाणे पत्र मिळाले.

"ता ५ सप्टेंबर रोजीं विनोबा रंगपूर जिल्ह्यातील सोनारहाटच्या बाजूनें पूर्वपाकिस्तानात प्रवेश करतील तुम्ही रंगपूर येथील सरकारी अधिकाऱ्यांना भेटून पदयात्रेची व्यवस्था वगैरे करावी." पत्र मिळताच आम्ही डावयाला जाऊन तेथल्या अधिकाऱ्यांना भेटून २७ ऑगस्ट रोजी रंगपूरला पोहोचलो. एवढ्यात "आम्ही ५ सप्टेंबर रोजी सोनारहाट येथें येत आहोंत तेथें आपली भेट होईल अशी आशा करतो" असे विनोबाचे हि पत्र आले रंगपूरला जिल्ह्याचे डेपुटी कमिशनर मि० याकुब अल्ली खान यांना भेटलों यात्रेसबंधी काही चर्चा केल्यानंतर रस्तापाहणी करणे, रोजची उतरण्याची ठिकाणे ठरविणे इत्यादि कामाकरिता दोघा उच्चपदस्थ सरकारी अधिकाऱ्यांबरोबर सरकारी जीपमधून दुसरे दिवशी सकाळी बाहेर पडलो. २८ ऑगस्टपासून ३१ ऑगस्टपर्यंत ४ दिवस रंगपूर आणि दिनाजपूर या जिल्ह्यातील रस्ते पाहिले, उतरण्याचीं ठिकाणे ठरविली आणि पदयात्रेचा कार्यक्रम निश्चित केला. विनोबांनीं ५ सप्टेंबर रोजीं रंगपूर जिल्ह्यातील सोनारहाट येथें प्रवेश करावा आणि २१ सप्टेंबर रोजीं दिनाजपूर जिल्ह्यातील विरल गावातून पूर्व पाकिस्तानची सीमा ओलांडावी असे ठरले.

एवढ्यात आमचे जोडीदार कार्यकर्ते आणि सहाय्यक मित्र हळूहळू रंगपूरला जमू लागले. सिल्हेट (श्रीहट्ट) येथील साप्ताहिक पत्रिका 'जनशक्ति' चे संपादक श्री. निकुंजबिहारी गोस्वामी आले, आमचे दुसरे प्रमुख कार्यकर्ते श्री. विश्वरंजन सेन कलकत्ता येथें होते तेहि तावडतोब रंगपूरला आले. रंगपूरचे प्रख्यात जुने वकील श्री. अतुलकृष्ण राय यांचे घर हें आमचे तात्पुरते उतरण्याचे ठिकाण झाले होते. आमचे दुसरे एक जोडीदार श्री रजतकुमार दत्त यांचेकडे विनोबाचे साहित्य वगैरे आणण्याचे काम सोपविण्यात आलें.

पद-यात्रेच्या वेळी सर्वोदय-साहित्याच्या प्रचारावर विनोबांचा विशेष भर असतो, साहित्य-प्रचार हे त्यांच्या पदयात्रेचे विशेष अंग आहे, पदयात्रेमध्यें ते ठिकठिकाणी साहित्यिकांच्या बरोबर विशेष चर्चा करतात, या सर्व गोष्टींमुळें आधीपासूनच साहित्य आणून ठेवले तर ते यावेळी उपयोगी पडणार होते. त्याशिवाय श्री रंजन यांनी विनोबांच्या चरित्रासंबंधी काही लहान लहान पुस्तकें छापली होती. त्या सर्वांचा या वेळी उपयोग होणार होता या प्रसंगी विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट अशी की, दोन वर्षांपूर्वी आम्ही सुमारे ५००० रुपयांचे गांधी साहित्य, सर्वोदय-साहित्य, विशेषत. विनोबांचे गीताप्रवचन सरकारकडून परमिट मिळवून आणले होते. ह्या दोन वर्षांत त्यातल्या बऱ्याच साहित्याची विक्री होऊन गेली होती.

पदयात्रेचा कार्यक्रम निश्चित झाल्यानंतरचे महत्त्वाचे काम म्हणजे विनोबांच्या उतरण्याच्या ठिकाणी कार्यकर्ते पाठवून तेथील व्यवस्था करणें हे होय

"विनोबा परिचिति" या नावाचे एक लहानसे परिपत्रक छापून घेण्यात आले होते. त्यात त्यांच्या पदयात्रेचा कार्यक्रम छापला होता. रंगपूरला सहकाऱ्यांशी चर्चा करून पुढें कोणी जावयाचे तें ठरवून टाकले या कामात निकुंजभाई हे मुख्य सहायक होते परंतु त्यांनी प्रथमच सांगितले होते की 'जनशक्ति' वर्तमान चालविण्याचे बंद करून अधिक दिवस येथें यावयें त्यांना शक्य होणार नाही पण जितके दिवस ते राहिले तितक्या दिवसांत होण्यासारखें काम त्यांनी अत्यंत निष्ठापूर्वक केले १ सप्टेंबर रोजीं निकुंजभाई आणि रंजन यांना पहिले मुक्कामाचे ठिकाण जें भुरुंगामारी तिकडे पाठविण्याचे ठरले. आवश्यक सामान घेऊन ते रवाना झाले. ता. ३ रोजी सकाळच्या गाडीने मी, विश्वभाई, शरणा चौधरी कल्पना दत्त आणि आदितकुमार देव वगैरेसह कुडीग्रामवरून भुरुंगामारी कडे निघालो कुडीग्रामचे श्री अपूर्वकुमार सेन वकील यांना पूर्वीच कळविण्यात आले होते. ते स्टेशनवर आले होते. गाडीमध्येंच त्यांच्यामुळे ह्यांचे ओ. सी साहेब (Officer Commanding E. P. R. East Pakistan

Regiment ) चे स्थानिक कमांडर वगैरेंचा परिचय झाला. त्यानांहि विनोबाच्या आगमनासंबंधी सरकारकडून त्यांच्याकडील काम पाहण्यासाठी पाठविण्यात आले होते विनोबाच्या पदयात्रेसंबंधी आमच्यामध्यें चर्चा झाली कुडीग्राम येथें अपूर्वबाबूच्याकडे त्यावेळेस जमलेल्या लोकांच्या बरोबर विचारविनिमय करून जेवण झाल्यावर नावेनें पाटेश्वरीला गेलो. तेथें काही सरकारी ऑफीसर विनोबाजींच्या पदयात्रेच्या कामासाठीं च बसनें भुरुंगामारीकडे चालले होते. आम्हाला पाहून ते थांबले आणि त्यांनी आमची तिकडे जाण्याची व्यवस्था केली आम्ही सारे बरोबरच रवाना झालों. सध्याकाळचे सुमारास भुरुंगामारी येथें पोहोचलों. तेथें पोहोंचल्यानंतर थोड्या वेळात स्थानिक प्रमुख हिन्दुमुसलमानांच्या बैठकी बोलावून त्यांना विनोबासंबधी सर्व माहिती सांगितली त्यांनी खूप श्रद्धेनें ती ऐकून घेतली रात्री दहा वाजेपर्यंत बैठक चालली. विनोबाचे पहिले उतरण्याचे ठिकाण स्थानिक हायस्कूलची इमारत व ठरविण्यात आले. त्या शाळेचे हेडमास्तरसाहेब खूप श्रद्धेनें त्या उद्योगास लागले. रात्रीं एकमेकांत विचार करून उतरण्याच्या ठिकाणाच्या व्यवस्थेसाठी निकुंजभाई आणि अजीतभाई यांना भुरुंगामारी येथें ठेवून बाकी सर्वांनीं दुसरे दिवशीं सोनारहाट येथें जावयाचे ठरविले.

रात्रीं बराच पाऊस झाला. पुष्कळ च झाला म्हणावयास हरकत नाहीं. रस्ता चिखलानें भरून गेला. सकाळीं उठून प्रार्थना स्नान वगैरे उरकून थोडा वेळ कांहीं ठिकाणीं फिरून आलो. स्थानिक लोकांच्या गाठी-भेटी घेतल्या. त्यांनीं विनोबांना एक मानपत्र देण्याचे ठरविले. जेवण झाल्यानंतर तिसऱ्या प्रहरीं निघण्याच्या उद्योगाला लागलो. एवढ्यांत श्री. पूर्णेंदुकिशोर सेन आणि श्रीमती सुहासिनी दास तेथें येऊन पोहोचले. श्री. पूर्णेंदुकिशोर सेन हे सिल्हटचे एक प्रमुख कार्यकर्ते आहेत. काँग्रेसचे नेते आणि पार्लमेंटचे सभासद होते. हल्लीं रंगीरखुल आश्रमाचे मध्यालय आहेत आणि श्रीमती सुहासिनी दास ह्या आश्रमाच्या सेविका आहेत. श्रीयुत रंजन सप्तटीप सर्वेंट ऑफीसरसाहेब यांच्याबरोबर सोनारहाटच्या सीम-करे रवाना झाले. श्री. पूर्णेंदु यांनी भोजन व विश्रांति झाल्यानंतर सरला

आणि कल्पना ह्यांच्याबरोबर मागून जावे असे ठरले, म्हणून मी आणि विश्वभाई दुपारी ३ वाजताच निघालो, आणि संध्याकाळी सोनारहाटच्या शाळेंत पोहोचलो त्या ठिकाणी थोडी विश्रांति घेतल्यानंतर तेथेंच उपस्थित असलेल्या सीमेवरील एका पोलीस ऑफीसरने विनोबाच्या पदयात्रेची काय व्यवस्था करायची हे समजून घेण्यासाठी काही सरकारी ऑफीसर तुम्हाला शोधत आहेत असे सांगितले आणि मला घेऊन ते सीमेकडे निघाले ज्या रस्त्यानें विनोबाजींनी यावयाचे ठरले होते त्या रस्त्यावर खूप जंगल वाढले होतें आणि इकडे तर संध्याकाळ होऊन अंधार पडू लागला होता परंतु सरकारी ऑफीसर आणि स्थानिक लोक खूप उत्साहाने उद्योगाला लागले, आणि किट्सन बत्त्यांच्या उजेडात सुमारे दोन तासांत त्यांनी रस्ता साफ करून टाकला सीमेच्या पलीकडे आसामच्या बाजूला एक उंच मंच तयार करण्यात आला त्या ठिकाणी विनोबांना निरोप द्यावयाचा समारंभ व्हावयाचा होता काही थोडे बाबू उभे करून त्यांना दोरी बांधून सीमेची रेषा दाखविण्यात आली होती त्या ठिकाणी उभे राहून पलीकडे कामाला लागलेल्या लोकांबरोबर संभाषणांनी परीचय झाला शाळेच्या इमारतीत च आमची रात्री राहण्याची व्यवस्था करण्यात आली होती रंगपूरचे डेप्युटी कमिशनरसाहेब, पोलीस सुपरिंटेंडेंटसाहेब, आणि कुडीग्रामचे सब-डिविजनल ऑफीसर तेथेंच उतरले होते रात्री त्यांच्याबरोबर विनोबाच्या पदयात्रेविषयी चर्चा झाली थोड्या वेळानें पूर्णेंदुदा, सुहासिनीदेवी, शरणा, कल्पना वगैरे मंडळीहि तेथें आली पहाटे लवकर उठून सगळी मिळून पाच वाजता सीमेकडे निघालो थोड्या वेळानें विनोबाजी पदयात्रिकांसह तेथें येवून पोचले गाणी म्हटली गेली निरोपाची एक एक भाषणे सुरू झालीं इतक्यांत आमच्या रंगपूरचे डेप्युटीकमिशनर साहेब, पोलीस सुपरिंटेंडट साहेब वगैरे त्या ठिकाणी उपस्थित झाले त्यांच्या बरोबर गोपाळपाडाचे डेप्युटीकमिशनर आणि पोलीस सुपरिंटेंडट हि आले होते

विनोबाजी बसले होते त्या बाजूनें 'चारुदा' अशी कोणीतरी हाक मारलेली माझ्या कानावर आली वर मान करून पाहिले तेव्हा आशादी

(श्रीमती आशादेवी आर्यनायकम्) मला बोलावत होत्या असे दिसले. आशादेवींनी आपले पासपोर्ट दिले आणि सामानसुमान दाखविले.

मंगळ्याची भाषणे झाल्यावर विनोबांनी थोडक्यात उत्तर दिले. त्याचा सारांश असा—

'आताच अमलप्रभादेवींनी मला विचारले कीं, तुमच्या भाषणाचा अनुवाद बंगाली भाषेंत करावा की असमी भाषेंत? मी सांगितले की, मी आसामचा निरोप घेऊन निघत आहें आणि येथील बंगाली लोकांना आसामी भाषा समजते तेव्हा आसामी भाषेंत च अनुवाद करावा

"आता मी आपल्यापुढें पुन्हा भाषण करण्याचा संभव नाहीं. तसे प्रयोजनहि नाही. आता निरोप देण्याची वेळ झाली आहे. वेळ समाळणे विशेष अगत्याचे असतें. गेल्या १॥ वर्षांत मी तुम्हाला पुष्कळ सांगितले, आणि अशाच प्रकारे गेली ११॥ वर्षे अखंड सांगत फिरत आहे. मात्र अलिकडे गेल्या २-३ वर्षांपासून मला मौनाची गरज भासू लागली आहे परंतु परमेश्वराचा तसा आदेश मिळेपर्यंत पूर्ण मौन धारण करणे मला शक्य नाही. मी १॥ वर्षांपूर्वी जेव्हां आसामात प्रवेश केला होता तेव्हां माधवदेवांच्या एका वचनाचे स्मरण मला झाले होतें. आजहि त्याच वाक्याचे स्मरण करून तुमच्या ह्या प्रदेशाचा निरोप घेत आहें. 'अल्पगुण करय विस्तार' हें ते वाक्य. जे थोर पुरुष असतात ते स्वल्प-गुणाचा विस्तार च करीत असतात. आसामात गेल्या १॥ वर्षांत कांहीं कार्य झाले आहे. त्यांत कांहीं गुण आहेत तसे दोषहि आहेत. आपण दोष सोडून द्यावेत आणि जे अल्पगुण आहेत त्यांचा विस्तार करावा. या ठिकाणीं कांहीं ग्रामदानें झाली आहेत. कांहीं मैत्रीची हवा उत्पन्न झाली आहे मैत्रीआश्रमाची स्थापना झाली आहे. मैत्रीची भावना आणि जिथे जिथे म्हणून जी ग्रामदानें झाली आहेत त्यांचा विस्तार तुम्हीं करावा हाच महापुरुषांचा आदेश आहे. मी येथून गुण घेऊनच जात आहें. मला पुष्कळ गुणांचा लाभ झाला आहे."

भाषण झाल्यावर मोटरबोटींतून विनोबा मंचावरून उतरले. रस्त्यावर डिप्टीकमिशनर आणि पोलीस सुपरिंटेंडेंट यांनी पुढें येऊन त्यांचे स्वागत

केले विनोबानी माझ्याकडे पाहून स्मित करून चारुबाबू म्हणून हाक मारली आणि मी त्याच्यासोबत चालावयास सुरुवात केली परंतु पदयात्रिकाच्या सामानाच्या वाहतुकीची व अन्य गोष्टीची जुळवाजुळव करण्याच्या गडबडीत असल्याने मी त्याचे सोबत चालू शकलो नाही आणि बरा च मागें पडलो तोपर्यंत बाबा बरेच दूर निघून गेले होते शेवटी झपाझप पावले टाकीत त्याना गाठले थोड्या वेळानें रंगपूरचे डेप्युटी-कमिशनर साहेब आणि पोलीस सुपरिंटेंडेंट साहेब यानी आमचा निरोप घेतला आमची पदयात्रा पुढें सुरू झाली विनोबाच्या बरोबर श्रीमती आशादेवी आर्यनायकम्, श्रीमती महादेवीताई, श्रीमती कालिंदी सरवटे, श्री बाळ टेंभेकर आणि श्री जयदेवभाई ही पाच मंडळी पाकिस्तानच्या पदयात्रेंत आली होती

या पदयात्रेच्या काळी रंगपूर आणि दिनाजपूर जिल्ह्यातील डेप्युटी कमिशनर मि खान आणि मि हसन, दोघे पोलीस सुपरिंटेंडेंट आणि ह्या दोन्ही जिल्ह्याचे सरकारी ऑफीसर आणि ह्या पदयात्रेशी विशेष संबंध असलेले सरकारी नोकर विनोबाची सर्वप्रकारची व्यवस्था स्वेच्छेनें करीत होते त्याकरिता विनोबानी त्याना निरोपाच्या वेळी अन्तःकरणपूर्वक धन्यवाद दिले विनोबाजीच्याकडे कोणीहि असौजन्य दाखवू नये, विनोबाजीना कोणत्याहि प्रकारें त्रास होऊ नये म्हणून रात्री पहारा देणें वगैरे कामी ते सर्वदा जागृत असत बिनतारी बातम्या देण्यासाठी वायरलेस सेटहि त्याच्याजवळ होता जरूर पडल्यास औषधाची व्यवस्था करण्यासाठी मेडीकल युनिट पदयात्रेबरोबर ठेवण्याची व्यवस्था करण्यात आली होती स्थानिक जनता विनोबाचे स्वयस्फूर्त स्वागत करीत होती आणि त्याची भाषणे ऐकण्यासाठी मोठ्या सख्येनें दुरून येत होती भाषणें ऐकणाऱ्या जनतेमध्यें ९० टक्के लोक मुसल्मान असत अत्यंत श्रद्धापूर्वक आणि शातपण ते भाषणे ऐकत भाषणाच्या शेवटीं होणाऱ्या मौन प्रार्थनेमध्यें अगदी शातपण स्थिर बसून राहात बघणाराला तें एक अपूर्व आणि मनोरम असे दृश्य होतें जनतेनें केलेल्या या हार्दिक सहकार्याचे मनःपूर्वक अभिनंदन करून हें माझे प्रारंभिक प्रकरण सपवितो

---

[ दिवस पहिला तारीख ५ सप्टेंबर, सोनारहाट ते भुरुंगामारी अंतर आठ मैल ]

आसाम प्रांताच्या निरोपाचे भाषण संपल्यावर विनोबाजी मचावरून खालीं उतरले आणि सोनारहाट येथें त्यांनीं पूर्व पाकिस्तानांत प्रवेश केला. बांबूना बांधलेली फीत सोडून रंगपूरचे डेप्युटी कमिशनर मी. याकूबअलीखान यांनीं विनोबांचे स्वागत केलें आणि त्यांची प्रेमयात्रा सुरू झाली.

बाबांनीं चालतां चालतां पुढें आलेल्या दोघा मुलांचे हात धरले आणि ते बरोबर चालू लागले. मी बराच मागें पडलों. पळत जाऊन त्यांना गांठलें आणि म्हणालों या ठिकाणीं सोनारहाट हायस्कूलच्या आवारांत थोडा वेळ थांबलें पाहिजे. त्याप्रमाणे बाबा तेथें येऊन उभे राहिले. त्या ठिकाणीं शाळेंतील विद्यार्थी आणि गांवांतील लोक यांनीं गर्दी करून त्यांच्याभोंवतीं वेढा घातला. पूर्व पाकिस्तानांतील प्रवेशानंतर लोकांच्यापुढें बाबांचें हें पहिलेंच भाषण होतें. त्यांत त्यांनीं प्रथम व पाकिस्तान सरकारनें पाकिस्तानांतून जाण्याची अनुमति दिल्याबद्दल पाकिस्तान सरकारचे अंतःकरणपूर्वक आभार मानले आणि पुढें म्हणाले—"पाकिस्तानी लोकांसाठीं प्रेम आणि शांतीचा संदेश घेऊन च मी येथें आलो आहे. येथें आल्याबरोबर एका गृहस्थांनीं मला विचारलें तुम्हांला येथें कसें वाटतें? मी त्यांना म्हणालों, येथें येऊन मला ५ मिनिटें हि झालीं नाहींत. तरीपण मला कांहींहि वेगळेपणा वाटत नाहीं. तीच हवा, तीच माती, तीच माणूस, तेच हृदय. भारतांतील लहानथोर मंडळी, स्त्रीपुरुष मला पाहून माझा [illegible]ठ करतात ज्या प्रकारचें प्रेम आणि प्रीति दाखवून देई त्याप्रमाणें येथें हि आपल्या दर्शनानें माझें हृदय प्रेमानें उचंबळून आलें आहे. सर्व दुनिया माझी आहे आणि मी दुनियेचा सेवक आहे असें मला वाटतें. मी

जेथें जेथें जातो तेथें तेथें 'जयजगत्' असे म्हणतो याचा अर्थ दुनिया एक आहे सर्व मानव एक आहेत"

सुमारे साडे नऊ वाजता बाबा मुरुगामारीला पोहोचले हायस्कूलमध्यें उतरण्याची व्यवस्था होती बाबाचे स्नान झाले थोडी विश्रांति घेतल्यावर शाळेची लायब्ररी, वर्ग आणि पाठयपुस्तके पाहण्याची इच्छा बाबानी व्यक्त केली हेडमास्तरसाहेबानी सर्व दाखविल्यानतर बाबानी लायब्ररीतील काही पुस्तके घेऊन ते ती पडल्यापडल्या चाळू लागले

दुपारी साडे बारा वाजता आम्ही जेवण्याच्या उद्योगाला लागलो एवढयात भारत सरकारचे डाक्का येथील डेप्युटी हायकमिशनर श्री एस् के चौधरी ह्याचे फर्स्ट सेक्रेटरी श्री एस सी घोष बाबाना भेटावयास आले पाकिस्तानात प्रवेश केल्यावरोबर भारत सरकारच्या वतीन स्वागत करणे हाच त्याच्या येण्याचा उद्देश होता ओळख करून दिल्यावर त्यानी सामान्य स्वरूपाच थोडावेळ बोलण केले जेवण झाल्यानतर दुपारी दोन वाजता ते निघून गेले जातांना विनोबाजीच्या पूर्व पाकिस्तानातील मुक्कामाच्या शेवटच्या दिवशी पुन्हा येईन असं त्यानी सागितले

लोकाची खूप गर्दी जमली होती कित्ती तरी लोक दर्शनाची इच्छा करीत होते मधून मधून त्याना खोलीजवळ नेऊन विनोबाचे दर्शन देण्यात येत असे

चार वाजता शाळेच्या मोठया प्रागणात प्रार्थना सभा झाली विशेष असा प्रचार झाला नव्हता तरी ४-५ हजार लोक सभेला उपस्थित होते आकाशातून आणि हवतूनच बाबा यणार ह्या गोष्टीचा प्रचार झाला हाता सभेच्या मचावर शामियाना होता बाबानी तिथें येताच तो काढून टाकावयास सागितले जनतेबरोबर मोकळया आकाशाखाली उभे राहण्याची त्याची इच्छा होती सभेसाठी एकच माइक होता सभेमध्यें बाबाच्या भाषणापूर्वी स्थानिक लोकानी एक मानपत्र अर्पण केले. शाळेच्या मुख्याध्यापकानी ते मानपत्र वाचून दाखविले बाबाच भाषण हिंदींत झाले. आशादेवी भाषणाचा अनुवाद करीत होत्या

विनोबा म्हणाले—

"आपल्याला माहितच आहे कीं, गेली साडे अकरा वर्षं मी पायी फिरत आहे विमानान येथून कराचीला पाच तासात पोहोचता येईल. तेव्हा अशा विज्ञानयुगात मी पदयात्रा करीत का फिरत आहे ? याच्या मागें एक विचार आहे पुष्कळ लोक लहान लहान खेड्यात राहतात ते तेथून बाहेर कोठें जात नाहीत पूर आला म्हणजे त्याना आपले स्थान सोडून बाहेर पडावे लागते तेवढेंच मी विमानानें फिरत राहिलो असतो तर या लोकाना भेटण्याची संधि मला मिळू शकली नसती म्हणून मी पायीपायी यात्रा करीत आहे

मी सर्व भारत फिरलों आहे. प्रत्येक जिल्ह्यात गेलो नसलो तरी सर्व राज्यप्रदेशामधें गेलो आहे. आतां आसामातून प. बंगालला मला जायचे होते तिकडे जाताना पूर्व पाकिस्तानचे दर्शन व्हावे अशी माझी इच्छा होती ' त्यासाठी पाकिस्तान सरकारची परवानगी मागितली. पाकिस्तान सरकारनें विचार केला 'हा माणूस फकीर आहे, गरीबाचा सेवक आहे, त्याचे दु ख दूर करण्याचा प्रयत्न करतो आहे, तेव्हा त्याला परवानगी द्यावी, असा विचार करून सरकारनें मला परवानगी दिली

आज तुमच्या दर्शनाने मला किती आनद झाला आहे याचे वर्णन करता येत नाही वाटेंत येताना थोडा पाऊस पडला लहान मुलाचे हात धरून खेळत खेळत आलो पावसामुळें मला काही त्रास झाला नाही पावसाच्या धाराच्या रूपाने मला भगवताचा आशीर्वाद मिळाला असे वाटले म्हणून पावसामुळें अधिक आनद आला तुमच्या दर्शनात मला परमेश्वराचे च दर्शन होत आहे गेली बारा वर्षे मला अशा दर्शनाचा आनद लाभत आहे या म्हातारपणी हि मी पायी चालत आहे माझा उत्साह कमी झाला नाही याचे कारण काय ? याचे कारण एवढेंच की दु खी माणसाचे दु ख मी सुखी माणसाच्या पुढें ठेवीत आहे. सुखी माणसाना मी सागतो तुम्ही दु खी माणसांचे दु ख दूर करा. कोणी भुकेला असला आणि आपण जर त्याला खायला दिल तर आपल्याला आनद वाटतो, परंतु तो आनद क्षणिक असतो कारण पुन्हा त्याला भूक लागते च

तेव्हा केवळ असे खायला देत राहिल्याने उभयपक्षी यथार्थ समाधान कसे होईल ? अर्थातच होणार नाही त्यासाठी त्याला अन्न उत्पादन करण्याचें साधन च दिले पाहिजे म्हणूनच ही गोष्ट मी सर्वत्र सागत असतो की ज्याच्याजळ जमीन आहे त्याने त्यातली काही जमीन गरीबासाठी दान द्यावी अशाप्रकार आम्हाला आजपर्यंत ४० लक्ष एकराहून अधिक जमीन मिळाली आहे आणि ती जमीन भूमिहीनाना वाटून देण्यात येत आहे अशा प्रकारे देण्यात फार मोठा आनद असतो माझ्या ल्हानपणची गोष्ट सागतो आमच्या घरी फणसाचे झाड होते फणस पिकला म्हणजे त्यातले गरे काढून प्रथम शेजाऱ्याच्या घरी द्यावयाला आईने सागायचे आणि मग च आम्हाला खायला मिळायचे अशा तऱ्हेने लोकाना वाटल्यानतर आपण खाण्यात जो आनद असतो त्याच्या स्मरणानें मला आजहि आनद वाटतो आपण खाण्यापेक्षा दुसऱ्याला खायला देण्यात अधिक आनद आहे ही गोष्ट कमीजास्त प्रमाणात प्रत्येकाच्या अनभवाची आहे या ठिकाणी पूर्व पाकिस्तानात जमीन कमी आहे अस म्हटले जाते १९५१ च्या खाने-सुमारीप्रमाण येथील लोकसख्या दर चौरस मैलास ७७७ होती आता वाढून ९०० झाली असेल अस समजा परतु केरळ प्रदेशात दर चौरस मैलास १४०० लोक आहेत असे असूनहि मला त्या ठिकाणी पुष्कळ भूमिदान मिळाले

## आपल्या उत्पन्नाचा काहीं अश दु खी माणसाला द्या

मी मोकळया हातानें या देशात आलो आहे आणि मोकळया हातानें जाणार आहे पण जर पाकिस्तानात भूमिदानाच कार्य सुरू होईल तर लाखो लोकाची हृदयें एकमेकाशीं जुळतील मैत्री, प्रेम, करुणा, दु खी लोकाची सेवा हे तर सव धर्मांचे सार आहे कुराणात म्हटल आहे—
—'**मिम्मा रजकना हुम युन फिकून**' आपल्या रोजगाराचा काही भाग दुसऱ्याला द्या, हा त्याचा अर्थ वेदातहि म्हटल आहे —'दान सविभाग' आपल्या सुखभोगाचा काहीं अश दुःखी माणसाला द्या असे च ख्रिस्ती धर्मानें सागितल आहे सर्व धर्मांनी दानाचा महिमा वर्णिला आहे आपण भूमिदान केले तर दात्याला पुण्य मिळेल, घेणाराला सुख लाभेल आणि

माझ्यासारख्या फकिराचे समाधान होईल. परमेश्वरानें सर्वांना जन्मतः सारखेंच जन्माला घातले आहे कोणी उच्च नाही, कोणी नीच नाही. श्रीमंत गरीब सर्वजण नग्न अवस्थेंतच जन्माला येतात. मृत्यूनंतर सगळ्यांचेच देह राखेंत किंवा मातींत परिणत होतात श्रीमंताची राख सोन्याची किंवा रुप्याची होत नाहीं ईश्वरानें सर्वांना समान जन्म दिला आहे तेव्हा सर्वजण समान च आहेत. परतु आम्ही अहंकारवश होऊन उच्चनीचता निर्माण करतो कोणी पैशाच्या अहंकारानें आपल्याला उच्च समजतो, कोणी जातीच्या अहंकारानें उच्च समजतो आणि अमक्याच्या हातचे खाणार नाहीं असे म्हणतो ईश्वराला 'रहमान् अर रहीम' अर्थात् दयाळू करुणामय असे म्हणतात परमेश्वर जर दयाळू असेल तर आपण निष्ठूर होऊन कसे चालेल ? आपण जर दुसऱ्याचे दुःख पाहून त्याच्यावर दया केली नाही, उच्चनीच असे भेद पाडले तर परमेश्वराची दया आपणास कशी लाभेल ?सर्वांवर सम भावानें प्रेम करुन सर्वांची सेवा करणे हाच प्रकृतिधर्म आहे, परमधर्म आहे. बाकीचे सर्व गौण आहे पशुपक्षी बोलू शकत नाहीत आपण बोलू शकतो म्हणून आपण केवळ सत्यच बोलावें, प्रेमाच्याच गोष्टी बोलाव्यात, दुसरे काहीहि बोलू नये.

आतां ५ मिनिटें आपण सर्वांबरोबर परमेश्वराच्या नांवाचे स्मरण करावयाचे आहे. या ठिकाणी स्त्रीपुरुष, बालवृद्ध, हिन्दुमुसलीम, ख्रिस्ती सर्व प्रकारचे लोक आहेत परतु दुःखाची गोष्ट आहे कीं, भगवताचे नांव घेण्याचे वेळी आपण वेगळेवेगळे होऊन जातों आपण अनेक कामें मिळूनमिसळून करू शकतों, परतु भगवताचे नांव घेऊन प्रार्थना करते-समयीं वेगळ्या ठिकाणीं जातों. देवाचे नांव घेतांना आपण वेगळें वसावे असा का परमेश्वर आहे ?

भगवताचे नांव कोणी संस्कृतमध्यें, कोणी अरबीमध्यें, कोणी इंग्रजीमध्यें किंवा दुसरे कोणी अन्य भाषेंत घेतात. या ठिकाणीं आपण हृदयाच्या भाषेंत त्याच नामस्मरण करावयचे आहे मौन राखून ज्याला जें नांव प्रिय असेल तें त्याने घ्यावे नांव घेऊन त्याच्या जवळ आपणास काय मागावयाचे आहे ? त्याला एवढेंच मागायचे कीं,

आम्हाला सत्य दे, प्रेम दे, करुणा दे. आता मौन प्रार्थना सुरू होत आहे. ॐ शान्ति. शान्तिः शान्तिः"

सर्व जनता मंत्रमुग्ध होऊन बसली. विडीसिगारेटहि ज्याच्या हातात होती त्यानी फेकून दिली. ते एक अपूर्व दृश्य होते. मौन प्रार्थनेच्या शेवटी विनोबा म्हणाले 'सर्वांना प्रणाम. जय जगत्'.

शान्त झालेल्या जनतेमध्यें पुन्हा गडबड सुरू झाली. कित्येक लोक निघून गेले. तरी दर्शन घेण्यासाठी नवीन लोक येतच होते. विनावाजी थोडा वेळ उघड्या जागेत फिरले त्यामुळें सर्व लोकाना त्याचे दर्शन झाले.

नतर विनोबा आपल्या खोलीत येऊन बसले गावचे काहीं प्रमुख लोक हि येवून बसले त्यापैकीं कुणाला कुराण शरीफ म्हणायला येत असल्यास त्यानें म्हणावे असे विनावानी सांगितले एका माणसानें कुराण-पाठ केला. वावानी शातपणे कुराण ऐकले. त्यानतर म्हणाले, तुम्ही मडळींनी आमच्या खाण्याजेवणाची व्यवस्था केली आहे परतु आम्ही तर एका दिवसाचे अतिथी आहोत. सर्वचजण अतिथीला अशा प्रकारे खाऊ घालतात. पण अशा प्रकारे आम्हाला खाऊ घालून तुम्हाला विशेष पुण्य मिळणार नाही जे कोणी दरिद्री भूमिहीन आहेत त्याच्यासाठी आपल्या जमीनीतला काही भाग दान केला तरच खरे पुण्य मिळेल. म्हणून काही भूमिदान करा, त्याकरिता आपापसात विचारविनिमय करा. जो दान देईल त्यानेंच कोणाला जमीन द्यावयाची ते ठरवावे. तो भूमिहीन असला पाहिजे एवढीच अट आहे तसेच त्याला ती जमीन वशपरपरेत मिळाली पाहिजे.

## पाकिस्तानमध्यें प्रथम भूदान

काहीं लोक उठून गेले. सध्याकाळचा गोधूलीचा समय. घराघरात दीप उजळू लागले होते. यावेळी घरात लक्ष्मी येते अशी पुण्यळाची भावना आहे. हळूहळू सध्याकाळ सपून रात्र होऊ लागली. वावांचे भाषण ऐकून एका माणसाचा अतरात्मा जागृत झाला. तो तिथें येऊन म्हणाला 'माझ्याजवळ चार एकर जमीन आहे, घरीं खाणारेहि बरेच आहेत-तरी देखील त्यातील एक विघा जमीन भूमिहीनासाठी मी दान करू

दरिद्रीना' हें दान स्वीकारून दानपत्र द्यायला त्यानें सांगितलें. पण तेव-ढ्यात म्हणाला, 'बाबा एक बिघा नको एक एकरच लिहा. एक एकरापेक्षा कमी जमीन त्याला झोपडीलाहि पुरणार नाही.' एक एकराचें दानपत्र लिहिण्यात आलें, घेणाराचें नाव लिहिलें. रजिस्ट्रेशन करण्यासाठीं लागणार बारा रुपयेहि आपण देऊ असें लिहून दानपत्र त्यानें बाबांच्या हातीं दिलें. बाबा त्याच्या माथ्यावर हात ठेवीत म्हणाले, मी अल्लाजवळ प्रार्थना करतो कीं, त्यानें तुम्हांस आशीर्वाद द्यावा. हें ऐकून दात्याच्या डोळ्यांत आनंदाश्रु आले. किती पवित्र दृश्य होतें तें!

## स्त्रियांना आवाहन-दानांत आनंद : २ :

[दिवस दुसरा ६ सप्टेंबर, भुरुगामारी ते रायगज अंतर ७ मैल]

पहिल्या दिवसाची यात्रा सुरू झाली. पहाटे दोन वाजता उठून सर्व जणानी निघण्याची तयारी सुरू केली सामानसुमान दोन बैलगाड्या भरतील इतकें झाले. गावाच्या बाहेर मोटार बस तयार होती त्यात नेऊन सामान ठेवण्याचे काम विश्वभाईकडे सोपविले सरकारच्या वतीनेंहि एका माणसाकडे ही जबाबदारी देण्यात आली होती तोहि हजर होता बरोबर चार वाजता बाबा बाहेर पडले. त्याच्या दोन्ही बाजूना कंदील हातात घेऊन बाबाचे हात धरुन जयविजय चालू लागले रस्ता दाखविण्यासाठी त्याच्या पुढें १५–२० हातावरून कल्पना कंदील घेऊन पायलटप्रमाणे पुढें चालली होती पहाटेच्या वेळी अंधारात कंदिल घेऊन रस्ता दाखविण्याची जबाबदारी कल्पनाकडे सोपविली होती. यात्रा सुरू झाली.

आजचे अंतर सुमारे सात मैलाचे होते भोवतालच्या सहा-सात मैलावरून मुक्कामाच्या ठिकाणी लोक जमले होते. आणि सर्व दिवसभर बाबाच्या आसपास च घोटाळत होते रायगजच्या शाळेंत आजचा मुक्काम होता. चारी बाजूला टीनच्या पत्र्याच्या भिंती होत्या त्यामुळें आत खूप गरम होते. स्नान झाल्यानंतर बाबा उघड्यावर एका झाडाखाली जाऊन बसले. मंडळी त्याच्या भोवती जमू लागली. शाळेंतील शिक्षक, स्थानिक प्रमुख व्यक्ति आणि पार्टीतील पाकिस्तानमधले कार्यकर्ते व सरकारी अधिकारी त्यात प्रामुख्याने होते आमच्या पार्टीत बाबासह आम्ही सहाजण आहोत त्याशिवाय चारुदा आणि त्याचे कार्यकर्ते मिळून एकूण दहा लोक असून ते सर्व पूर्व पाकिस्तानातील गांधींचे अनुयायी आहेत. पण आमची एकूण पार्टी बरीच मोठी आहे त्यात सरकारी नोकर आणि त्याचे सिक्युरिटी आफीसर्सहि आहेत. बहुतेक सर्व तरुण आहेत. त्याच्यापैकी

काहीजण आज बाबास भेटले. चारपाच वृत्तपत्राचे बातमीदारहि आहेत. सर्व तरुण आहेत

एका वर्तमानपत्रवाल्यांनें 'आपल्या पदयात्रेचा उद्देश काय ?' असा प्रश्न विचारला बाबांनी उत्तर दिले, प्रेमाच्या गोष्टी सांगणे. पुन्हा विचारले कुणाबरोबर प्रेमाच्या गोष्टी बोलायच्या ? बाबांनी हसत हसत उत्तर दिले, सर्वांबरोबर मी तर ह्या भोंवतालच्या झाडावरहि प्रेम करतो. आज झाडाच्या छायेतच विष्णुसहस्रनामाचा पाठ झाला.

सध्याकाळच्या सभेची आम्हाला फार च उत्सुकता वाटत होती. काल भूदानावर बोलले. एका एकराचे दानहि मिळाले. आज कोणता विषय असणार ? शेवटी चार वाजले. सभेच्या ठिकाणी सर्व जाऊन बसलो. पाहतो तो माइक बिघडला होता. हजारो लोकांची सभा माईकशिवाय कशी चालणार ? जनता बाबांचे भाषण ऐकण्यास आली होती. परंतु कोणालाहि त्यांचे भाषण ऐकू येईना. गडबड सुरु झाली. बाबा मंचावरून खाली उतरले आणि सभेच्या मध्यभागी जाऊन उभे राहिले. आशादेवी त्यांच्या मागोमाग गेल्या. सभेच्या मध्ये उभे राहून उच्च स्वरानें बाबा बोलू लागले. सभा एकदम शांत होऊन गेली. लहान मुलेहि स्वस्थ बसली. माईकची उणीव भरून निघाली.

'स्थानिक लोकांनी गावात जाऊन भूदानाची गोष्ट लोकांपर्यंत पोहोंचवावी' असे मराठी बाबांनी सांगितले होते. भूदानगंगेची धारा इथें हि वाहू लागली आहे. आज ५ दानपत्रें मिळाली. एकजण दाता स्थानिक मुस्लिम कौन्सिलचा चेअरमन आहे आणि इतर चार जण स्थानिक हिन्दु गृहस्थ आहेत. दान घेणाऱ्यात दोघे मुस्लीम आणि तीन हिन्दु होते.

सभेला सुमारें चार हजार लोक जमले होते बाबा आपल्या भाषणात म्हणाले—

"मी गेली साडेअकरा वर्षे भारतात पायी फिरत आहे. यावेळी पाकिस्तानात येण्याची इच्छा होती. सरकारनें कृपा करून मला परवानगी दिली. हे पुण्य काम आहे म्हणून परंतु सभेला लोक पुष्कळ आले आहेत. पण

त्यामध्यें एकहि स्त्री नाही ही दु खाची गोष्ट आहे. जर तुमच्या सोबत तुमच्या आयाबहिणी आल्या असत्या तर हीच सख्या दुप्पट झाली असती भुरगामारी येथें तेयले काही लोक माझ्याजवळ येऊन बसले होते. त्याना मी विचारले स्त्रियाहि सभेला येऊ शकतील की नाही ? त्यानी उत्तर दिले आधीपासून तशी व्यवस्था केली तर स्त्रियाहि येऊ शकतील. माझ्या ह्या प्रेमाच्या गोष्टी त्यानी हि ऐकायला पाहिजेत. परमेश्वरानें त्यानाहि दोन कान दिले आहेत. या पहा आमच्याबरोबर आशादेवी फिरत आहेत. सगळया जगात प्रवास करून आल्या आहेत. माझ्या भाषणाचा अनुवाद करून ऐकवीत आहेत याच्याप्रमाणे स्त्रियानींहि सभेला आले पाहिजे.

## मालक तर ईश्वर आहे

परमेश्वराने आपल्याला मानवजन्म दिला आहे खाणे, पिणे, झोपणे, आजारी पडणे आणि एके दिवशी मरून जाणे वगैरे गोष्टी पशुपक्षानाहि लागू आहेत त्याना जर खायला मिळाले नाही तर विचारे निरुपायानें उपाशी राहतात ते कधी स्वेच्छेने रोजा राखीत नाहीत. परतु माणूस मात्र स्वेच्छेने रोजा राखतो आणि तसे करण्यात त्याला आनन्द वाटतो. माणसाला दान देण्यात हि आनद वाटतो ही दानवृत्ति वाढली पाहिजे. एक दिवस सर्वांनाच मरावयाचे आहे. तेव्हा आपण मालक म्हणून किती दिवस राहणार आहोत ? मेल्यानतर आपल्याला जर जमीन बरोबर नेता आली असती तर जमिनीचा मालक म्हणविण्यात अर्थ होता परतु मनुष्य निघून जातो आणि जमीन मात्र जियल्यातियें कायम असते तेव्हा जमिनीचा मालक, जमिनीचा स्वामी मानव नाही, ईश्वर आहे

इथें सागण्यांत येत की, जमीन फार कमी आहे, लोकसख्या पुष्कळ आहे परतु दाट लोकसख्येच्या केरळ प्रातातहि आम्हाला हजारों दानपत्रें मिळाली आहत कारण तेथल्या लोकाना हा विचार पटला समजा एखाद्याच्या घरीं पांच जण आहेत आणि खाण्याच्या वस्तु मात्र चौघानाच पुरण्याइतक्या आहेत तर काय चौघेजण खातील आणि पांचव्याला 'तुला काही खायला मिळणार नाही जास्ती मिळेल तेव्हां देऊ' असे म्हणतील ? नाहीं.

ते सर्व सारख्या प्रमाणात वाटून खानील. यालाच म्हणायचे खानदानी. होय खरी माणुसकी आहे, खरा धर्म आहे-"

सभा सपल्यानतर विनोबानी 'सुरा फातेहा' म्हटले आणि 'ॐ शान्तिः शान्ति शान्ति ' म्हणून मौन प्रार्थनेला सुरुवात केली. जनता अगदी स्तब्ध शात होऊन बसली होती. प्रार्थनेनतर 'सर्वांना प्रणाम. जयजगत्' असे म्हणून विनोबाजी निघून गेले.

अजूनहि आजूबाजूच्या गावातून लोक येतच होते. ते म्हणाले सभा चार वाजता सुरू होऊन दहा वाजेपर्यंत चालते असे आम्ही ऐकले होतें. आम्ही काम सपवून सावकाशपणे बाबाचे दर्शन घेण्यास आणि भाषण ऐकण्यास आलो आहोत. पण भाषण तर पाच वाजताच सपले आहे आतां आम्हांला बाबाचें भाषण ऐकायला कसे मिळणार ? पाहता पाहता लोकाची सख्या वाढत चालली तेव्हा बाबाना सागण्यात आलें कीं जवळ जवळ २-३ हजार लोक आले आहेत त्याना जर चार शब्द तुम्ही सांगितले तर बिचाऱ्याना आनंद वाटेल बाबा हसत हसत उठले. यावेळीं ते गीता प्रवचनावर स्वाक्षरी देत होते.

सुमारे साडेपांच वाजता ते पुन्हा येऊन जनतेच्या पुढें उभे राहिले. पुन्हा त्यानीं छोटेंसे भाषण दिलें. ह्या दुसऱ्या भाषणाचा सारांश असा—

"आज तीन भूदानें मिळाली आहेत. मी तर काही मोबती बरोबर घेऊन रोज नवीन नवीन गावी भ्रमण करीत असतो. एका गावांत फक्त एकच दिवस राहतों मामी यायल्यांकीं कोणाशीहि बोलस नाहीं. तुमच्या भाषेतहि मी बोलू शकत नाहीं. त्या भाषेत जर मला बोलता आलें असतें तर मी स्वत. तुमच्या घरीं येऊन प्रेमानें मागें म्हणणें तुम्हाला समजावून सागितले असतें, आणि आज जी तीन भूदानें मिळालीं त्या ऐवजीं ३० भूदानें मिळविलीं असती......"

ह्या दुसऱ्या भाषणानतर बाबा आपल्या खोलींत जाऊन बसले तेव्हां आणखी दोन दानें मिळालीं. अशा प्रकारें आज एकूण पांच भूदानें मिळालीं.

---

## ग्रामनिर्माण -- शक्तीचें केंद्र : ३ :

[दिवस तिसरा, ७ सप्टेंबर. रायगज ते नागेश्वरी, अतर ६ मैल]

आजचा रस्ता सहा मैल आहे. हवा सुदर होती. दोन्ही बाजूला भाताचीं पिकें होती. मधून मधून तागाचीं हि होतीं. झाडावर पक्षी सुस्वर गाणी गात होते. वातावरण प्रसन्न होत "राजवैद्य लपून बसला होता. हा राजवैद्य कोण?" बाबा गाष्ट सागत होते–'मुलगा आजारी होता. पुष्कळ वैद्याचीं औषधें झाली परतु गुण येईना शेवटी बाप मुलाला म्हणाला 'बेटा आज राजवैद्य येणार आहे, तो तुला तपासील आणि मग तू बरा होऊन जाशील'. राजवैद्याचे स्वागत करण्यासाठी घरदार साफ करण्यात आले. मुलाचे अग पुसून स्वच्छ करण्यात आले घराच्या सर्व खिडक्या दारे उघडण्यात आली. हळूहळू सूर्यनारायणाचा उदय झाला. घरात सूर्यकिरणाचा प्रवेश झाला. चारी बाजू उजळून निघाल्या. मुलाला बाप म्हणाला 'तो ऽऽऽऽ पहा राजवैद्य. तुला पाहायला आला आहे' मुलानें राजवैद्याकडे पाहिले आणि तेव्हापासून मुलगा हळू हळू बरा होऊ लागला. त्याचा आजार पार पळाला" बाबा आकाशाकडे बोट दाखवून म्हणाले. तोच राजवैद्य ढगांतून आज वर आला आहे.

### अध्यात्म म्हणजे काय ?

अध्यात्म म्हणजे काय याविषयी आशादेवीबरोबर गोष्टी चालल्या होत्या. बाबा म्हणाले एकदा गोरा यानी असाच प्रश्न विचारल्यावरुन मी त्याना सागितले होतें —'अध्यात्मामध्यें पाच विषय अतर्भूत आहेत.' बाबा हिंदी, इग्रजी असे भिश्र बोलत होते. या ठिकाणी पूर्णपणे इग्रजीतच त्याचे म्हणणे उद्धृत केले आहे.

(१) Faith in absolute moral values
परीशुद्ध नीतीवर विश्वास.

(२) Sanctity and unity of life
जीवनाची पवित्रता आणि एकत्व. अर्थात् सर्व जीवनच एक आणि पवित्र आहे.

(३) Continuity of life after death.
मृत्युनंतरहि जीवनाची अविच्छिन्नता अर्थात् मृत्युनंतरहि जीवनाचे अस्तित्व

(४) Faith that there is an Order in the world.
जग काहीं नियमानें चाललें आहे याविषयीं विश्वास.

आणि (५) कर्माचें फळ अटळ आहे. (ही गोष्ट त्यांनी हिन्दीमध्येंच सांगितली.)

पूर्णेंदुमाईंनी विचारलें, परमेश्वराचें एकाच नावानें स्मरण केलें तर बरें नाहीं का? नाना नामें घेतली तर एकाग्र चिंतनात बाधा येत नाहीं का? बाबांनी उत्तर दिलें— 'परमेश्वराचें वेगवेगळ्या नामानें स्मरण करणें म्हणजे त्याच्या विविध गुणांचें स्मरण करणें होय. यामुळें स्मरण करणाऱ्याला जर कोण्या एखाद्या गुणाची उणीव वाटत असेल तर त्या गुणाचा लाभ आणि विकास होण्यास सहायता मिळते. कोण्या एखाद्याच्या स्वभावात निर्दयता प्रबळ असेल तर भगवंताच्या दयामय नावाचें स्मरण केल्यास त्याची निर्दयता कमी होऊन जाईल.'

* * *

रस्त्यामध्यें मधून मधून लोक स्वागत करतांना 'पाकिस्तान झिंदाबाद,' 'जय जगत्' अशा घोषणा करीत. पहिल्या दिवसापासूनच रस्त्यात जयजगत् ची घोषणा ऐकूं येऊं लागली. बाबा थोडा वेळ शांत राहिले. आणि मग म्हणाले—पहा मी जयजगत् विषयीं तुम्हाला समजावून सांगितलें आहे. तो बोलण्याचा विषय आहे. ओरडण्याचा विषय नाहीं. मला रस्त्यात चालतांना शांति पाहिजे.

सात वाजण्याच्या थोडें पूर्वीच नागेश्वरीला पोहोंचलों. हायस्कूलच्या इमारतींत कॅंप होता. खूप लोक जमले होते. जमलेल्या लोकांना उद्देशून बाबा बोलले—

"पाकिस्तानातील आमचा आजचा तिसरा दिवस आहे मला कोणी कोणी विचारतात तुम्ही येथें का आलात ? मी त्याना सांगतो मी प्रेमासाठीं आलो आहे प्रेम घ्यायचे आणि प्रेम द्यायचे याच उद्देशानें माझी यात्रा गेली ११॥ वर्षे चालली आहे आणि मृत्युपर्यंत ती तशीच चालणार आहे

सध्याचे युग विज्ञानाच आहे विज्ञानाच्या सहाय्यानें देशातील काही लोक शक्तिशाली होऊ शकतील पण सारा देश केव्हा बलवान् होईल ? जेव्हा गाव बलवान होईल तेव्हा गाव हा देशाचा पाया आहे त्यावर राष्ट्राची इमारत उभी व्हायची ह तुमचे नागेश्वरी गाव हा आहे तळ मजला, दुसरा मजला रंगपूर, तिसरा मजला डाका आणि चौथा मजला होईल कराची असे चार मजले मिळून एक राष्ट्र बनत जर एखाद्या इमारतीचा तळमजला मजबूत नसेल, मोडकळीला आला असेल तर वरचा मजला टिकेल कसा ? म्हणून सर्वांत तळचा मजला जें गाव त मजबूत केलें पाहिजे गावातील लोकाना योग्य अन्न मिळाल नाहीं, मुलाबाळाना खायला दूध-लोणी मिळाले नाही, सगळे लोक दुबल असतील, गावातली जनावरें गाई बैल याना चागला चारा न मिळाल्यामुळें दुबळी झाली असतील तर गावच्या धान्याचे उत्पादन कमी होईल मग रंगपूर, डाका, कराची याना खायला धान्य कोठून मिळेल ? म्हणून तळमजला मजबूत केला पाहिजे सध्याचीं ही खेडा खेडीं नसून ती केवळ काही घराचे समूह आहेत जेव्हा गावचे लोक मिळून शक्ति आणि संपत्ति एकत्र करतील तेव्हाच त्या गावाला गांव म्हणता येईल ढाका राजधानी आहे म्हणून पूर्वपाकिस्तान आहे तिकडे कराची आहे म्हणून पाकिस्तान आहे पण येथें नुसतीं काहीं थोडीं घरे जवळजवळ वसली आहेत गाव कोठेंच नाही तुम्ही म्हणाल पाकिस्तानांत सुमार १॥ लक्ष गाव आहेत पण मी म्हणतो मला कोठेंहि गाव आढळल नाहीं काही घराचा समुदाय मात्र दिसला गावात राहणाऱ्या सगळ्याची शक्ति जेव्हा एकत्र होते तेव्हा त्याला यथार्थपणें गाव नाव शोभत सध्या असा सन्देश गांव कोठेंच नाहीं सग गांव जर असतें तर कोणाच्याहि घरी मुलामुलीचे लग्न निघाल्यावर त्याला अडचण पडली नसती समजा एक लहानसं गांव आहे चार पराव लग्नें व्हावयाची आहेत तीं

अर्थातच सध्या वेगवेगळी होतात. पण ते जर गाव असते तर एके दिवशींच चारी विवाह एकाच ठिकाणी करता आले असते खर्च कमी झाला असता, कर्ज काढावे लागले नसते, सगळया गांवाला आनन्द झाला असता सर्व जमातींच्या घरातील विवाह एकदम एका ठिकाणी साजरे केले तर परस्परावर प्रेम वाढेल सर्व गाव एका कुटुंबासारखें होईल असे जेव्हा होईल तेव्हा ते गाव गाव या नावास पात्र होईल शक्तिशाली होईल

भुरुगामारी येथें एका मुसलमान युवकानें आपल्या चार एकर जमिनीपैकी एक एकर जमीन दिली कुणाला जमीन द्यायची तेंहि ठरवून टाकले दुसऱ्या दिवशी रायगज येथें पाच लोकांनी भूदान दिलें. भारतांत आजपर्यंत सुमारे ४० लक्ष एकर भूमिदान प्राप्त झाले आहे. त्यातील १० लक्ष एकराचें वितरणहि झाले आहे. बाकीच्या जमिनीचें वितरण करण्यात येत आहे भारताप्रमाणे येथेंहि सुखी लोक आहेत, दु:खी लोक आहेत माझा विश्वास आहे की इथल्याहि जमीनमालकाचें अंत:करण खुलेल नदी आपल्या उगमाजवळ अगदी लहान असते क्रमाक्रमानें पुढें मोठी होत जाते त्याप्रमाणेच या प्रेमनदीची धारा अगदीं लहान आकारांत सुरू झाली आहे मी येथें थोड्या दिवसासाठीं आलो आहे. जे कांहीं दिवस मी येथें असेन तोंपर्यंत ही प्रेमनदी वाहत ठेवीन. नंतर काय होईल याचा मी विचार करीत नाहीं नदी वाहायला सुरुवात करते तेव्हां आपण पुढें कसे मोठें व्हावे याचा कांहीं ती विचार करीत नाहीं. ती आपल्या बारीक धारेनें आपल्या वेगानें वाहू लागते नंतर एकएका बाजूनें एकएक धारा तिला येऊन मिळू लागतात तिचा विस्तार, वेग वाढतो. अशाप्रकारें ती विशाल आकार धारण करते. त्याप्रमाणेंच ही जी प्रेमनदी सुरू झाली आहे ती हि थोडी हळू वाहेल एखादेवेळ कदाचित तिला पूरहि येईल. पण त्या पुरामुळें कोणाचें नुकसान होणार नाहीं, सर्वांचा फायदा होईल."

नंतर विनोबा मुलांकडे वळून म्हणाले—

"तुम्हांला माझें म्हणणें समजत आहे की नाहीं ? तुम्ही आपल्या घरीं जाऊन ही भूमिदानाची कथा आपल्या आईला सांगाल की नाहीं ?

तिला सांगा एक बाबा गरीबासाठी जमीन मागतो आहे. मग आई म्हणेल, बाळांनो तुमच्यासाठीच तर आम्ही जमीन राखून ठेविली आहे ! तेव्हा तुम्ही आईला सांगा—गरीबाच्या घरींहि तर आमच्यासारखी मुलेमुली आहेत. ती आमच्या बरोबर खेळतात. त्यांचे हि दुःख दूर केले पाहिजे. नाही का? आणि तसे करायचे तर ह्या बाबाला काही जमीन दिली पाहिजे. पण मी जमीन घेऊन काय करणार आहे ? मोकळ्या हातानें आलो मोकळ्या हातानें जाणार आहे माझ्या हाती ४० लक्ष एकर जमीन आहे. परंतु हे पहा माझे हात माझ्या हाताला माती सुध्दा लागलेली नाही. तुम्ही लहान मुलें माझे प्रचारक आहात. मग सांगा तुमच्यापैकी कोणकोण आपल्या आईला माझें म्हणणे सांगणार त्यांनी हात वर करावेत." (सगळ्या मुलांनी हात वर केले. दोन तीन उत्साही मुलांनी दोन्ही हात वर केले. )

* * *

आज हवा फार सुरेख होती. बाबा स्वस्थपणे आपल्या खोलींत पडून राहिले होते. वाऱ्यानें दरवाजा बंद झाला होता. मी त्यांच्या जवळ जाऊन बसलो

आम्ही जे कार्यकर्ते त्यांच्याबरोबर होतो त्यांची प्रत्येकाची नावे त्यांनीं विचारलीं व सर्वांचा परिचय करून घेतला. दुपारी विष्णुसहस्र-नामाचा पाठ झाल्यावर एकेकाला बोलावून कोण कोठें राहतो, काय करतो इत्यादि विचारपूस केली शाळेच्या समोरच एक सुन्दर जलाशय होता, त्यामुळें हवा गरम भासत नव्हती

सध्याकाळच्या प्रार्थनासभेसाठी मोठा समाज जमला होता. ९-१० हजार लोक तरी असावेत माईक बिघडला त्यामुळें बाबा मंचावरून उठले व सरळ लोकामध्यें उभे राहून त्यांनीं बोलायला सुरवात केली. परंतु इतक्या सर्वांना आवाज कसा पोंचणार ? तेवढ्यांत माईक दुरुस्त झाला व बाबांनी मंचावर येऊन भाषण सुरू केले.

'आमच्या पू० पाकिस्तानच्या यात्रेचा आजचा तिसरा दिवस. तुम्ही पुष्कळ लोक जमला आहात. सगळ्यांच्या मध्यें खूप उत्साह दिसतो आहे. कारण त्यांना माहीत झाले आहे कीं एक भूमिवाला बाबा आला

आहे गोष्ट खरी आहे. गली ११॥ वर्षे हा बाबा पायी चालून जमीन मागत फिरत आहे मी भारतातील सर्व जिल्ह्यात गेलो नसलो तरी सर्व प्रदेशात फिरलो आहे आता पाकिस्तानात प्रथमच येत आहे. पाकिस्तान सरकारनें कृपा करून परवानगी दिली आहे

## मी ईश्वराच्या आज्ञेने फिरत आहे

तुम्हाला ऐकून माहीत असेल की भारतात ४० लक्ष एकर भूदान मिळाले आहे आणि त्यासाठीच बाबा फिरतो आहे सगळयाच्या अंत करणात परमेश्वर आहे लहान मुलाच्याहि अंत करणात तो आहे तो विराट आहे पण अगदी लहान ठिकाणी हि तो प्रकट होऊ शकतो या ठिकाणी आताच एका काजीसाहेबानी माझ्या आग्रहावरून कुराणाचे गायन केले त्यामध्यें एक वचन आहे त्याचा अर्थ असा की 'अल्ला आकाश व मातीचा प्रकाश आहे' ल्हानसा दिवा घरातील कोपऱ्यात असतो परंतु साऱ्या घराला प्रकाश देतो त्याप्रमाणेच ईश्वरहि ह्या ल्हान लहान अंत करणात राहतो परंतु त्याचा प्रकाश पसरतो– तो प्रकाशरूप च आहे. परमेश्वरावर अशा प्रकारे श्रद्धा ठेवून मी येथें आलो आहे. ११॥ वर्षापूर्वी हैद्राबादेंत तेलंगणात गेला होतो त्या ठिकाणीं कम्युनिस्टांचा फार जुलूम होता सरकारचाहि त्याच्यावर जुलूम होता त्या ठिकाणी मी पायी गेला एक लहानसे गरीब खेडें होते सभेमध्यें विचारले 'कोणाला कशाची उणीव आहे?' तेव्हा काहीं लोकानी सांगितले "आम्हाला काम नाही जमीन मिळाली तर आम्ही नीट काम करू शकू" माझ्या मनात आले, या लोकाना मी जमीन कोठून देऊ? त्या-वेळीं सभेला गावातील ल्हानमोठे बरेच लोक आले होते मी त्या लोकाना जमीनीबाबत विचारले त्यातला एक जण उठून उभा राहिला आणि त्याने लोकाना जितकी जमीन हवी होती त्यापेक्षा अधिक च जमीन दान दिली. त्यारात्री मला झोंप आली नाहीं मी देवाला विचारले 'हा काहीं मला इशारा आहे का? मी असेच जमीन मागत जावी का?' भगवतानें उत्तर दिले 'जमीन मिळो किंवा न मिळो तू मागत जा' तेव्हापासून मी सर्व काम सोडून जमीन मागत फिरतो आहे तेलंगणात दोन महिन्यात बारा हजार एकर जमीन मिळाली

आता प्रश्न उत्पन्न होतो की पूर्व पाकिस्तानात जमीन आहे कमी. पण मी पाहतो तेव्हा मला सर्वत्र एकच दृश्य दिसते—चारी बाजूला जमीन आणि वर आकाश. येथे दर चौरस मैलास ९०० लोकसंख्या आहे, तर केरळ प्रदेशात १४०० आहे. त्या ठिकाणी हि मला पुष्कल जमीन मिळाली. पाकिस्तानात पहिल्याच दिवशी एका मुसलमान युवकाने आपल्या चार एकर जमीनीपैकी एक एकर जमीन दिली. मी त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणालो ईश्वर तुला दुवा देवो. तेव्हा त्याच्या डोळ्यात एकदम अश्रु आले. दुसऱ्या दिवशी पाच भूदाने मिळाली. मोठी नदी सुद्धा उगमा-जवळ लहानच असते नतर वाढत वाढत विशाल होत जाते

एका जणानें विचारले तुम्ही तर येथें सोळा दिवसच राहणार आहात, नतर काय होईल ? मी म्हणालो जितके दिवस मी येथें आहे त्या अवधीत प्रेमविस्ताराचे काम करीन तेवढ्यात मला मृत्यु आला तरी माझ्या मनात पूर्ण शांति राहील मी तीन दिवस झाले पाकिस्तानात आहे. तेथले हवापाणी अन्न खात आहे येथें जरी माझा देह पडला तरी मला कृतार्थ वाटेल मी सोबत्याना सांगेन की माझ्या अस्थि येथील मातीत मिसळून जाऊ देत माझ्या अस्थि भारतात न्याव्यात अशी माझी इच्छा नाही. गेल्या तीन दिवसात इथें एकूण सहा दानपत्रें मिळाली. आता येथेंच माझें जीवन समाप्त होऊन गेले तरी माझ्या मनात शांतीच राहील. कारण येथें या विराट जनतेची सेवा करण्याचा सुयोग मला लाभला आहे मला भारत आणि हा देश यामध्यें काही वेगळेपणा दिसत नाही. सगळ्या देशातील सर्व जाती परमेश्वरानें निर्माण केल्या आहेत.

## दानाचा महिमा

या देशचे जे मुसलमान आहेत ते कुराणाचे भक्त आहेत. हिन्दू आहेत ते गीतेचे भक्त आहेत आणि ख्रिश्चन बायबलचे भक्त आहेत. सर्व धर्मांत दानाचा महिमा गायिला आहे. कुराणात प्रथमच सांगितले आहे की, अल्लानें जो रोजी दिली आहे त्यातून गरीबासाठी खर्च करा. हिन्दू धर्मांतहि 'दानं सम् विभाग.'. दान करून वाटून खा, असे सांगितले आहे. बायबल म्हणतें शेजाऱ्यावर आपल्याप्रमाणेच प्रेम करा. आपल्या उत्पन्नातून जो

गरीबासाठीं दान करतो तो मुसलमान, असे कुराणात मुसलमानाचे लक्षण सांगितले आहे. भारतात केरळ प्रदेशात ख्रिस्ती लोकांनीं भूदान केलें आहे. ते म्हणाले कीं तुम्ही ह्या ख्रिस्ती धर्मांतीलच गोष्टी सांगत आहात. काश्मीरमध्येंहि मला भूदान मिळाले तेथले मुसलमान मला म्हणाले, तुम्ही कुराणातल्याच गोष्टी सांगत आहात. काशी जवळ सारनाथला गेलो होतो. तेथील बौद्ध म्हणाले तुम्ही गौतमबुद्धानें सांगितलेलेच बोलत आहात. अर्थात् हिन्दु मुस्लीम, ख्रिस्ती, बौद्ध, शीख या सर्वांची शिकवण एकच आहे आणि ती म्हणजे सर्वांवर प्रेम करा. प्रेमानें गरीबांना सहाय्य करा. माझा विश्वास आहे कीं, या देशातहि खूप भूदान मिळेल. परंतु त्यासाठीं उत्साहानें उद्योगाला लागले पाहिजे. घरोघर ही गोष्ट पोहोचविली पाहिजे. येथील लोकांनीं खटपट केली तर काम होऊन जाईल.

सगळयांना वाटतें की आपला देश मोठा व्हावा बलवान् व्हावा. पण जेव्हा खेडेगाव शक्तिशाली होईल तेव्हा देशहि शक्तिशाली होईल. खेडयांतल्या लोकांना दूधलोणी मिळाले नाहीं, गाईबैलांना योग्य खुराक मिळाला नाहीं तर जमीनीची मशागत होईल कशी ? पीक मिळेल कसे ? आणि पीक आलें नाहीं तर देश बलवान् होईल कसा ? म्हणून सगळया गावानें एक झाले पाहिजे. एक मन, एक हृदय, एक परिवार झालें पाहिजे. जातीभेद, धर्मभेद, भाषाभेद याचे सर्व झगडे नाहींसे केले पाहिजेत. हे जे वेगवेगळे धर्म आहेत त्यांत कुठेंच झगडण्याच्या गोष्टी नाहींत. पण आपण मात्र त्यांच्या नावानें झगडत असतो. कुराणांत सांगितलें आहे "तुम्ही सर्वांनीं मासें काम करावे" त्याचे काम म्हणजे कोणतें काम ? तर सगळयांना जमीन मिळाली पाहिजे, घरोघर चरखा चालला पाहिजे, ग्रामोद्योग चालले पाहिजेत, गावात कपडयाचा उद्योग मोठया प्रमाणात चालला पाहिजे. म्हणजे मोठ्यांत गूढ संपत्ति उत्पन्न होईल, गाव सुखी होईल. पावसाचे पाणी भेदाभेदानें पडत पण सर्व ठिकाणीं पडतें. आणि त्याचें विशाल सरोवर बनतें त्याप्रमाणे घरोघर चरखा चालला, ग्रामोद्योग चालले तर घरोघर प्रभाव सर्वत्र जमा होईल.

माझा विश्वास, आज काही मोठ्याच गोष्टी मी बोललों आहे. पुढें हळूं हळूं अधिक गाजेल. मुख्य गोष्ट ही कीं सगळे भेद दूर केले पाहिजेत,

व्याज घेता उपयोगी नाही घरोघर चरखा चालला पाहिजे तर गाव सुखी होईल मजबूत होईल"

सभेनंतर मौनप्रार्थना होऊन सभा सपली आज एक दानपत्र मिळाले.

---

## मालकीचा दावा ईश्वरी इच्छेच्या विरोधी : ४ :

[दिवस चौथा, आठ सप्टेंबर. नागेश्वरी ते भीतरवद, अतर ७ मैल]

नेहमीप्रमाणे चार वाजता यात्रा सुरू झाली वाटेत रस्त्यामध्ये अधारात कोणीतरी उभें होते बाबाना पाहताच ते गृहस्थ पुढे आले. त्याच्या हातात पाण्यानें भरलेली एक बाटली होती. बाबाचा रस्ता अडवून त्याना म्हणाले, 'माझा मुलगा आजारी आहे पुष्कळ औषधें केली बरे वाटत नाही. आपण हे पाणी मन्त्रून द्या, म्हणजे माझा मुलगा बरा होऊन जाईल' बाबानी त्याचा हात धरला बाटली हातात घेतली आणि म्हणाले अल्लावरती श्रद्धा असेल तर तुमचा मुलगा निश्चित बरा होईल,' माणूस सलाम करून निघून गेला हा माणूस बाबाची वाट पहात किती वेळ उभा होता कोणास ठाऊक त्याच्या कानी आले होते की, भारतातून एक फकीर आला आहे ह्या रस्त्यानें जाणार आहे. म्हणून धावत रस्त्यावर येऊन उभा होता हिंदू असो मुसलमान असो. साधु फकीर याच्यावर सर्वांची श्रद्धा आहे सगळयाचा त्याच्या वचनावर विश्वास आहे.

गांव जवळ आले तसे बॉय स्काऊट आणि पोलीसदल यानी कवायतीनें बाबाचे स्वागत केले सुमारे ७ वाजता मुक्कामाचे ठिकाणी पोहोचलों एका जुन्या जमीनदाराच्या घरी मुक्काम होता. समोर विशाल मैदान होतें. सुमारे ४०० पेक्षा अधिक लोक जमले होते. त्याना उद्देशून बाबा म्हणाले—

### प्रेमाचा प्रकाश पसरूं दे

"आज आम्ही एका बाबूच्या खेड्यात आलो आहों. अशा खेड्यात हृदयाचा प्रकाश अधिक असतो मोठया गांवांत जेथें गाडीचा, मोटरचा

रस्ता असतो त्या ठिकाणीं वृद्धि अधिक असते. पण हृदयाचा प्रवाह कमी असतो. सगळ्या देशांत हीच स्थिति आहे. ह्या तुमच्या गांवाचें नांव भीमरबंद आहे. म्हणजे आंतले गांव. या ठिकाणीं तर हृदयाचा विशेष प्रकाश असला पाहिजे. मला पाकिस्तान सरकारनें दया करून प्रेमानें पाकिस्तानांतून जाण्यास परवानगी दिली आहे. पूर्व पाकिस्तानांतला आजचा माझा चौथा दिवस आहे मी या ठिकाणीं विशेष कांहीं काम घेऊन आलेलों नाहीं. माझें काम एकच आहे आणि तें म्हणजे प्रेमाची वाणी बोलणें. बाकी सर्व ईश्वराच्या इच्छेनें जें काय व्हावयाचें तें होईल. एकवेळ प्रेमाची हवा पसरूं लागली म्हणजे नाना तऱ्हेचीं कामें सुरू होतील. गरीबांना जमीनी मिळतील, आयावहिणी घरोघर चरखा चालवूं लागतील, गांवांत उत्पन्न झालेली खादी गांवचे लोक वापरूं लागतील, कोणी हि व्याज घेणार नाहीं वगैरे वगैरे. ज्याप्रमाणें सकाळीं सूर्यनारायणाचा उदय झाल्याबरोबर नाना प्रकारचीं कामें सुरू होतात—कोणी नांगरानें जमीन नांगरूं लागतात, मुलें अभ्यासाला लागतात, स्त्रिया घरकाम करूं लागतात—त्याप्रमाणेंच प्रेमाचा प्रकाश पडूं लागला म्हणजे गरीबांना जमीन दान देणें, घरोघर चरखा चालविणें, व्याज न घेणें इत्यादि अनेक चांगलीं कामें सुरू होऊन जातात.

त्याना समजाऊन सागत होते कीं मजुराना जमीन दिली तर मालकाच्या शेतात ते अधिक प्रेमाने काम करतील. कामचुकारपणा करणार नाहीत आता तर भूदानाचा 'इफतीताह्' होऊन गेला आहे. दार उघडले आहे. आता या कामाचा विस्तार करणे हे तुमचे काम आहे

सध्याकाळी शिक्षकाशी बोलणे झाले बाबानी त्याना अनेक प्रश्न विचारले शेवटी शिक्षकानी बाबाच्या मुखातून कुराण ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली बाबा हसले आणि सूर धरून कुराणातील पाच सूरे त्यानी म्हणून दाखविले. शिक्षक तन्मय होऊन ऐकत होते म्हणाले आमच्या धर्माची भाषा आम्हाला म्हणता येत नाही, पण ती आपल्या मुखातून ऐकून आम्हाला फार आनन्द झाला

* * *

सध्याकाळच्या प्रार्थनासभेला सुमारे पाच हजार लोक जमले होते. नेहमीप्रमाणे चार वाजता सभा सुरू झाली बाबा म्हणाले—

"आज आमच्या पदयात्रेचा चौथा दिवस आहे आपल्या दर्शनाने मला फार आनन्द झाला आहे यावेळी तर फक्त १६ दिवसासाठी मी येथें आलो आहें. माझें जर काम योग्य असेल आणि परमेश्वराची तशी इच्छा असेल तर या सोळा दिवसातच पोडदाक्लानी पूर्ण काम होऊन जाईल या चार दिवसातच लोकामध्यें जो उत्साह आणि जें प्रेम मला दिसून आले, त्यामुळें मी फार प्रभावित झालो आहे या देशातील जनतेत आणि भारतातील जनतेंत मला काहीहि वेगळेपणा दिसत नाही

या ठिकाणी जमीन कमी आहे असे म्हटले जाते. भारतातील केरळ प्रदेशात त्याहूनहि कमी आहे चीन जपान वगैरे देशात जमीन खूप कमी आहे. म्हणून शेतीबरोबर ग्रामोद्योगाचीहि जरूर आहे. जमीन कितीहि कमी असली तरी ती ईश्वराने सगळ्यासाठीं दिली आहे. ज्याप्रमाणे हवा-पाणी यावर कोणाची मालकी नाहीं, त्याप्रमाणे जमिनीवर हि कोणाची मालकी नाहीं. जमीनीवर मालकीचा दावा करणे हे ईश्वराच्या इच्छेच्या

विरुद्ध आहे असेच सार्‍या धर्मांचे सांगणे आहे. म्हणून जमीन सर्वांचीच झाली पाहिजे.

## मजुराला खुष ठेवले पाहिजे

हे विज्ञानाचे युग आहे. विज्ञानाच्या मदतीनें उत्पादन वाढविले पाहिजे. या देशात किंवा भारतात एक एकर जमीनीतून जितके पीक शेतकरी काढतो त्याच्या चौपट जपानात जपानातला शेतकरी विज्ञानाच्या मदतीनें काढतो म्हणून विज्ञानाची मदत शेतीच्या कामात घेतली पाहिजे. त्या शिवाय पीक वाढविण्याचा दुसरा उपाय म्हणजे मजुराला खुष राखले पाहिजे. हल्ली काम करताना मजूर आळस करतो मजूर शेतात काम करावयास जातो तेव्हा त्याच्या एका हातात कामाचे एखादे अवजार असते आणि दुसर्‍या हातात तंबाखूचा हुक्का असतो असे दृश्य दिसते. दोन्ही हात गुंतल्यानंतर मग काम कोणत्या हातानें करायचे ? मालक समोर नसेल तर मजूर कमी काम करतो. मजूर काम कमी करतो म्हणून मालकहि त्यांना कमी मजुरी देतो. मजूर काम चुकवून मालकाला कामांत फसवितो तर मालक मजुराला पैशात फसवितो याचा परीणाम पीक कमी येतें, देशाचे उत्पादन घटतें गाडीला दोन बैल असतात. त्या प्रमाणें उद्योगाच्या गाड्याला हि दोन बैल असतात. एक मालक आणि दुसरा मजूर–दोन्ही बैल जर एका चालीवर चालतील तर गाडीला धक्के बसणार नाहीत, गाडी ठीक चालेल. भूमिहीन मजुराला जर जमीन दिली तर त्या जमिनीत तो व त्याची मुलेबाळें राबतील. शिवाय हि शेतांत काम करतील आणि मग मालकाच्या जमिनीमध्ये हि तो चुणीनें राबेल. अशा रीतीनें त्याला मजुरी मिळाल्यामुळें तो संतुष्ट राहील आणि मालकासहि समाधान लाभेल. सध्या हल्ली मालक आणि मजूर यांचा तंटा आहे. म्हणूनच कम्युनिझम फोफावत आहे. आम्हाला कम्युनिझम नको असेल तर आपण प्रेमानें मजुराला संतुष्ट राखले पाहिजे तलवारीनें कम्युनिझम रोखता येणार नाही.

माझ्या भावांना ४० लक्ष एकर जमीन मिळाली आहे. हीच प्रेमाची मागणी घेऊन मी भारतातील सर्व जिल्ह्यांत जातो आहे. सर्व

## गांवांत भांडवल उभारलें म्हणजे ग्राम-विकास होईल

आता तर स्वराज्य मिळालें आहे. लोक म्हणतात आतां सर्व काम सरकारनेंच करावें. आकाशातून पावसाच्या धारा पडतात त्याप्रमाणें साखरेचा पाऊस का पडणार आहे ? आकाशातून फक्त पाण्याचीच वृष्टि होणार आहे तीच ईश्वराच्या कृपेची वृष्टि आहे तिच्या जोडीला जर आपण आपल्या श्रमाची साथ दिली तर पीक उमें होईल. केळी पाहिजे असतील तर केळाची बाग लावली पाहिजे. तांदूळ पाहिजे असतील तर भात पेरले पाहिजे. गावात पैसा नसतो. पैसा असतो शहरात. भांडवल कराचीमध्यें आहे म्हणून पाकिस्तान आहे. ढाक्यात भांडवल आहे, पैसा आहे म्हणून पूर्व पाकिस्तानचें अस्तित्व आहे. पण कराचींत सूर्योदय झाला असेल आणि आमच्या घरात मात्र अंधार असेल तर त्याचा आम्हाला काय उपयोग ? म्हणून गावाचे हि काही भांडवल असायला हवे. आज तसे गावाचे भांडवल नाही गावात पैसा आहे पण तो वेगवेगळ्या घरी आहे त्यामुळें ते गाव नाही, जवळ जवळ असलेल्या घराचा समूह आहे तो आपण जर सर्व घरातील पैसा, भांडवल एकत्र केले, ग्रामसभा स्थापन केली, तरच त्याला गाव असे म्हणता येईल. पण ते व्हायचे कसें ? त्यासाठी गावाच्या जमीनमालकानें गरीब भूमिहीनाना जमीन द्यावी. दरवर्षी प्रत्येकानें आपल्या उत्पन्नातला काही अंश गावाला द्यावा आणि गावाचें भांडवल उभारावें, गावाचा विकास करावा. असें झालें म्हणजे ग्राम निर्माण होईल. हाच भूदानाचा उद्देश आहे सगळें गाव एका कुटुंबासारखें होईल त्याचा पाया प्रेम हाच असेल. आपण सर्वजण एक ज्याप्रमाणे अल्ला एक आहे त्याप्रमाणे इन्सानहि एकच असला पाहिजे. अनेक जाती, अनेक धर्म, अनेक देश, मालकमजूर हे सर्व भेद नाहीसे करुन सर्व गावाचें एक कुटुंब झालें नाही तर त्याला ग्राम म्हणता यावयाचें नाहीं. त्याची उन्नति होणार नाहीं. म्हणून मी इथें पहिल्या दिवसापासून भूदान मागत आहे आणि पहिल्या दिवसापासूनच तें मिळत आहे. थोडें थोडें मिळत आहे. मी थोडे दिवसच या देशात राहणार असलो तरी ग्राम होणारच आहे, कारण सर्व मानवामध्यें प्रेम आणि करुणा असतेच. या

कामासाठी माझी कसलीहि सस्था नाही. इथेंहि नाही, भारतातहि नाही. वर्तमानपत्रकर्ते मला विचारतात की मी गेल्यावर भूदानाचे काम चालविण्यासाठी एखादी सस्था स्थापन करणार आहात का ? मी त्याना सागतो "नाही" कारण माझा सस्थावर विश्वास नाही. माझा विश्वास मनुष्याच्या हृदयावर आहे

यानतर पाच मिनिटानी मौन-प्रार्थना सुरू झाली प्रार्थनेनतर एक भूदान मिळाले सध्याकाळपर्यंत आजच्या भीतरवद गावी तीन दानपत्रें मिळाली

# दोन समस्या-भूक आणि अणुअस्त्रें : ५ :

[दिवस पाचवा तारीख ९ सप्टेंबर, भीतरबंद ते कुडीग्राम. अंतर ८ मैल]

आज चार मैल चालत आणि चार मैल नावेनें कुडीग्रामला जायचे आहे म्हणून उद्या पहाटे ३॥ वाजतां निघायचे असे काल बाबांनी सांगितले होते त्याप्रमाणे आज पहाटे साडेतीन वाजतां यात्रा सुरू झाली

चालतांना वाटेंतच प्रार्थना झाली कालपासून वर्तमानपत्राचे बातमीदार बरोबर आहेत प्रार्थनेनंतर त्या बातमीदाराशी विनोबांनी बोलायला सुरुवात केली

'स्टेट्समन'चा प्रतिनिधी बाबांना म्हणाला, आपल्या ह्या भूदानाची फिलॉसफी आम्ही नीटपणे समजू शकलो नाही. या भूदानयज्ञाच्या द्वारा समस्या सुटतील असें आम्हाला वाटत नाहीं.

बाबांनी उत्तर दिले, भूदान-यज्ञात फिलॉसफी कांहीं च नाही. केवळ प्रेम च प्रेम आहे, आणि हें प्रेम जसजसें वाढेल तसतशा समस्या सुटतील

दुसरे एक गृहस्थ म्हणाले ब्रह्मपुत्रेला पूर आला तर भारत आणि पाकिस्तान या दोन्ही हि देशांचे नुकसान होईल. जर हे दोन्ही देश एकत्र येऊन योजना आखतील तर बरें होणार नाही का ?

विनोबा—खचीतच बरं होईल त्यासाठीं दोन्ही देशांत फेडरेशन व्हायला पाहिजे. मी तर सर्व ठिकाणीं हेंच प्रेम निर्माण व्हावें असें इच्छितों म्हणूनच तर अवघं फेडरेशन व्हावें असें मला वाटतें म्हणून च मी 'जयजगत्' अशी घोषणा करीत असतों

यात्रेमध्यें बोलत बोलत अगदी नदीच्या घाटावर पहाटेच पोहोंचले तेव्हां सुमारें साडेसहा वाजले होते. एक सुंदर सजविलेली नाव घाटावर उभी होती. नावाड्यानें बाबांचे पाय धुऊन त्यांचे स्वागत केलें. नावेंत नें दूरवर दिसायचे ते येथेंहि दिसेना. नावेने बराच लांबचा मार्ग आक्रमावयाचा होता सुमारें १॥-२ तास लागणार होते.

नाव जेव्हा तीरावर पोहोचली तेव्हा नदीच्या काठावर स्वागतासाठी फार मोठा समाज उपस्थित होता. ती गर्दी पाहून मनात एक विचार येई की, ह्या लोकाना बाबा येणार असल्याची वार्ता कोणी सागितली असेल ? आमचे कार्यकर्ते तर त्याच्यापर्यंत पोहोचलेहि नव्हते. मग हे एकत्र जमले कसे ? कस्तुरीचा सुवास दूरपर्यंत पोहोचतो. कस्तुरीमृग येत आहे हे काही सागावे लागत नाही. त्याप्रमाणेच बाबाच्या आगमनाची वार्ता कदाचित वायुदेवच त्याच्यापर्यंत पोहोचवीत असावा !

कुडीग्राम येथें सरकारी मुलीच्या शाळेंत मुक्कामाचे ठिकाण होतें. सुमारे साडेसात वाजता कुडीग्रामला पोहोचलो

सध्याकाळी हायस्कूलच्या मैदानात विराट प्रार्थनासभा झाली सुमारे १४-१५ हजार लोक उपस्थित होते. त्यात स्त्रीयाहि बऱ्याच होत्या. बाबा म्हणाले --

'आज आमच्या यात्रेचा पाचवा दिवस आहे. आपण प्रेमानें येथे जमलो आहात ही आनदाची गोष्ट आहे आपल्याकडून मला हे जें प्रेम मिळत आहे त्याबरोबरच मला आणखी एक गोष्ट हवी आहे ती म्हणजे भूमिहीनासाठी जमीन गेले चार दिवस मला गरीबासाठी काही ना काही जमीन मिळाली आहे या कुडीग्रामात मला आज कुडी (वीस) दानपत्रें मिळाली पाहिजेत

## भूकेचा प्रश्न भूदानानें सुटेल

जगातील प्रश्न क्रमश वाढतच आहेत. हे प्रश्न सोडविण्यासाठीं तृतीय वर्षीय आणि पचवर्षीय अशा नाना योजना करण्यात येत आहेत. परंतु गरीबाची भूक शात करण्याचा कोणताहि मार्ग सापडलेला नाही. त्याचे दु ख वाढतच आहे भूदानानें हा प्रश्न सुटेल आपण दोन्ही हातानी काम केले पाहिजे परमेश्वरानें सेवा करण्यासाठी आपल्याला लाव लाब दोन हात दिले आहेत पण तोड मात्र एकच दिले आहे. याचे महत्त्व आहे त्यानें जर आपल्याला दोन तोडें आणि एक हात दिला असता तर उत्पादन कमी झाले असतें, अन्नधान्य जास्ती लागले असतें आणि मग जगाची स्थिति भयकर होऊन गेली असती.

हल्ली जगात दोन मोठे प्रश्न आहेत. एक आहे गरीबांची भूक आणि दुसरा आहे अणुशस्त्र. जगाचा विध्वंस करणारा बॉंब तयार झाला आहे. विज्ञानाची शक्ति मनुष्याच्या हातात पुष्कळ आली आहे त्या बरोबरच भोगाची उपकरणें आणि भोगाची इच्छाहि खूप वाढली आहे. लोकसंख्या वाढत आहे त्याबरोबर भूकहि वाढत आहे. ही भूक शांत करावयाचा उपाय म्हणजे वाटून खाणे. जोपर्यंत अशी व्यवस्था होत नाही तोपर्यंत जगात शांति येणार नाही. म्हणूनच भूदान-यज्ञाला क्षुधा-शांतीचे साधन असे मी म्हणतो.

## अणुअस्त्रांत भय आहे, प्रेमांत समाधान आहे

दुसरी समस्या अणुअस्त्रांची. आज लहान मोठी अणुअस्त्रें तयार होत आहेत त्यामुळें परस्परात भय वाढत आहे. रशियामध्यें शस्त्रास्त्रें, कारखाने, व्यापार, शेती यामध्यें वाढ झाली तर अमेरिकेला भय वाटतें आणि अमेरिका जर विज्ञानशक्तीनें बलवान् झाली तर रशियाला भय वाटतें. अशा प्रकारें परस्परामध्यें संशय आणि भय वाढतच आहे आणि परिणामी भयंकर नाश करणारी शस्त्रें तयार होत आहेत. केव्हा काय होईल हें सांगता येत नाही. सुमारे १७ वर्षांपूर्वी जपानातील हिरोशिमावर अमेरीकेनें अणुबॉंब टाकला. त्यामुळें लक्षावधी लोक मरण पावले; लक्षावधी लोक जखमी झाले. कित्येक विकलांग झाले. त्याचीच प्रक्रीया अजूनहि चालू आहे. बॉंब पडल्यानंतर सर्व काही धावून गेले. परंतु प्रश्न सुटला नाही. शस्त्राच्या सहाय्यानें कोणताच प्रश्न सुटत नाही.

परमेश्वरानें सर्व माणसाना प्रेम शिकविले आहे. त्याच्या योजनें बालपणापासूनच माणसाला प्रेमाचें शिक्षण मिळते. आईकडूनच प्रेमाचे मातृभाषेचे आणि धर्माचे शिक्षण मिळतें. सत्य बोलावे, प्रेम करावे शान्ति राखावी ह्या गोष्टी आईबापच मुलाना शिकवितात. पुराणात सांगितले आहे. सर्व लोकांचाच नाश होणार आहे. फक्त जे लोक ईश्वरावर विश्वास ठेवतील, योग्य काम करतील, सत्यानें वागतील त्यांचा नाश होणार नाही. माणसाला इतर प्राण्याचे दु ख पाहवत नाही असे कोमल हृदय भगवंतानें माणसाला दिले आहे. आणि गम्मत अशी की हाच माणूस

दुसऱ्या माणसाला भितो. या भयापासून आपणाला मुक्त झाले पाहिजे. परस्परातील भेद मिटवून टाकले पाहिजेत. प्रेमानें राहिले पाहिजे."

## पहिलें संपत्तिदान

प्रार्थनेनतर या गावी चार भूदानें मिळाल्याची घोषणा करण्यात आली. त्यातील एका दानपत्रात ५० बिघे जमीन दहा लोकाना वाटण्यात आली होती.

सभेनतर काही वेळ बाबा आपल्या निवासस्थानी निवांतपणे बोलत बसले होते. एवढ्यात एक चणेमुरमुरे विकणारा माणूस येऊन बाबाना महिन्याला पाच रुपये सपत्तिदान देण्याचे दानपत्र देऊन गेला. त्याच्याजवळ दान द्यायला जमीन नव्हती; पण काही तरी बाबाना देण्याची ा होती म्हणून त्यानें हे दानपत्र लिहून दिले होते.

आज बाबानी पाकिस्तानच्या घटनेचे पुस्तक वरवर पाहून घेतले. एकदा माझ्याबरोबर येथील बेसिक डेमॉक्रसीसबधी चर्चा केली. सर्व पाकिस्तानातील युनिअन कौन्सिले, त्याच्या सदस्याची सख्या, चेअरमनची सख्या इत्यादीची त्यानी माहिती करून घेतली.

## बेसिक डेमॉक्रसीचा पाया--प्रेम आणि कर्म : ६ :

[ दिवस सहावा १० सप्टेंबर कुडीग्राम ते पागा, अंतर ९ मैल ]

कुडीग्रामपासून पागाचे अंतर नऊ मैल आहे म्हणून आदल्या दिवशी-प्रमाणे आजहि पहाटे ३॥ वाजता निघावे लागले. सहा मैल गेल्यावर वाटेंत कठालवाडी नामक ठिकाणी पागा गावच्या लोकांनी बाबांचे स्वागत केलें. ती मडळी बाबांना जरा बाजूच्या वाटेनें घेऊन निघाली, त्यामुळें वाटेचें अंतर थोडें वाढलें पण त्यामुळें गांवातील स्त्रीयांना बाबांचे दर्शन मिळालें वाटेंत एक खूप मोठें वडाचें झाड लागलें त्या झाडाच्या छायेखाली बाबा थोडा वेळ थांबले स्थान मोठें रमणीय होतें झाडाच्या अनेक पारंब्या जमीनीपर्यंत पोहोचल्या होत्या त्या पाहून 'उर्ध्वमूलमधः शाखम्, हा श्लोक गुणगुणत बाबांनी यात्रा पुन्हा सुरू केली ७॥ वाजता मुक्कामाला पोहोचलो मुक्कामाची जागा हायस्कूलची इमारत होती गांवात शिरताना रस्त्यावर एक कमान गावकऱ्यांनीं उभारली होती. त्यावर 'जयजगत्' लिहिलें होते. शाळेची इमारतहि सुन्दर तऱ्हेनें सजविली होती. शाळेच्या मैदानात सकाळी सुमारे एक हजार लोक जमले होते बाबा लोकांना उद्देशून म्हणाले —

### आताचे युग सामुहिक युग आहे

"पूर्व पाकिस्तानातला आजचा आमचा सहावा दिवस आहे. काल कुडीग्राम येथें बरेंच भूदान मिळालें सुमारे साठ विघे जमीन मिळाली. आज येथें पोहोचण्यात मला थोडे जास्त श्रम झाले आहेत म्हणून थोड्या जास्त मजुरीची मी अपेक्षा राखोन गावात किती लोक भूमिहीन आहेत त्याचा हिशोब करुन त्या सर्वांना काही ना काही जमीन मिळेल एवढें दान आपल्याकडून मिळावें हें सामूहिक युग आहे. या युगात सर्वांनीं एकत्र मिळून काम करूं पाहिजे गांवाचे प्रश्न गावातल्या लोकांनीं सामूहिक रीतीनें सोडविले पाहिजेत पाकिस्तानात बेसिक डेमॉक्रसी स्थापन करण्यात आली आहे. युनियन कौन्सिलचे ८० हजार समासद आहेत त्यांनी सर्वांनीं भूमिदान

द्यावे आणि भूदान मिळवावे हि या कार्यातला जो मधुर आस्वाद आहे तो मी चाखला आहे, आणि तोच मी तुम्हाला चाखवू इच्छितो वर्तमानपत्रकर्ते मला विचारतात की, तुम्ही येथून निघून गेल्यावर भूदानाचे काम चालविणारी एकादी सस्था तुम्ही स्थापन करणार आहात का ? मी त्याना सागतो, नाही कसलीहि सस्था मी स्थापन करणार नाही परतु याविषयी माझा एक निर्णय होऊन गेला आहे तो म्हणजे या बेसिक डेमॉक्रसीचे युनिअन कौन्सिलच हें कार्य करणारी माझी सस्था होईल आणि ती ते काम हाती घऊ हि शकेल त्यानी हें काम हाती घेतलें तर त्याची प्रतिष्ठा वाढेल आणि लोकाचा त्याच्याविषयीचा आदर आणि श्रद्धाहि वाढेल ते देतील तर सामान्य थोडीशी जमीन पण त्याच्या मोबदल्यात हजारो लोकाचे प्रेम आणि सहानुभूति मिळवितील ''

* * *

बाबाचे स्नान आणि विश्राति झाल्यावर गावातील प्रमुख लोक त्याना भेटावयास आले शाळेचे शिक्षकहि उपस्थित होते बाबानी त्याच्यापुढें एक नवीन विचार माडला बेसिक डेमॉक्रसीसबधी बोलताना बाबा म्हणाले––

## प्रेम आणि करुणा हाच बेसिक डेमॉक्रसीचा पाया

पाकीस्तानचो हल्लीची घटना मी आज थोडीशी वाचली बेसिक डेमॉक्रसी ही एक चागली सुरुवात झाली आहे असे म्हणता येईल सत्तेच्या दृष्टीनें तिच्याकडे न पाहता प्रेम आणि करुणेच्या दृष्टीनें तिचे काम चालले पाहिजे डेमॉक्रसी छोटी असली तरीहि वरूनच सत्तेचा अश खाली येतो तेव्हा सत्तेबरोबर ईर्षा हि उत्पन्न होते मोठें क्षेत्र असले म्हणजे तेवढी ईर्षा वाटत नाही कारण त्या ठिकाणी Outlook म्हणजे दृष्टि मोठी असते लहानशा क्षेत्रात सकुचितता असते म्हणून ईर्षा आणि द्वेष वाढण्याचा सभव अधिक म्हणून केवळ सत्तेचे विकेंद्रीकरण केल्यामुळें ग्रामस्वराज्य होऊ शकणार नाही मोठया दगडाचे फोडून कितीहि ल्हान तुकडे केले तरी तो दगड दगडच असणार त्याचे काहीं लोणी होत नाहीं त्याप्रमाणें सत्तेचे तुकडे करून काम होणार नाही ग्रामस्वराज्याचा पाया प्रेम आणि करुणा हाच असला पाहिजे. प्रेम आणि दान यावरच त्याची इमारत

उभारली पाहिजे, गावात गावच्या लोकांची एक समिति स्थापावी. ती ग्रामसभा गाववाल्याकडून त्यांच्या उत्पन्नाचा काही भाग दानात ग्रहण करील आणि त्यांच्यातून गावाच्या कल्याणाची कामें करील. ग्रामोद्योग वाढवील, शिक्षणाची व्यवस्था करील, गावातील झगडे कोर्टात जाऊ देणार नाही गावातच मिटवून टाकील. वरून काहीं मदत मिळाली तर ठीकच; न मिळाली तरी काही चिंता नाही अशा प्रकारे गावात समता स्थापन होईल आणि युनिअन कौन्सिल कल्याणकारी होईल. जे भूमिहीन असतील त्यांना जमीन दिली पाहिजे आणि नंतर सर्व गावाचेच ग्रामदान झालें पाहिजे ग्रामदान म्हणजे मालकीचें समर्पण."

* * *

*आज सर्व दिवसभर स्थानिक लोकांच्या बाबाशी गाठीभेटी होत* होत्या. सध्याकाळी चार वाजता प्रार्थनासभा झाली. या लहानशा गावातहि सभेला दहा हजारावर लोक होते स्त्रीयाहि पुष्कळ होत्या. सभेच्या सुरुवातीस पागा हायस्कूलचे शिक्षक विद्यार्थी आणि गावकरी लोक यांच्या वतीनें विनोबाजींना संस्कृत भाषेंत एक मानपत्र देण्यात आलें. एका शिक्षकानें त्याचा बंगाली अनुवाद वाचून दाखविला. *विनोबाजींनी भाषणांत* सांगितले—

## जाति, देश यांच्यापेक्षां मोठी माणुसकी

"आमची इथली ही थोड्या दिवसाचीच यात्रा आहे आणखी फक्त दहा दिवसच येथें राहावयाचे आहे. हा परिचय अल्प काळचा आहे. परंतु किती तरी दिवसापासून आपली ओळख आहे असें वाटतें. तुमच्या सर्वांच्या मुखावर जो प्रेमभाव प्रकट झालेला दिसतो त्यावरून कोणीहि मला अपरिचित आहे असें वाटत नाही. तुमचा उत्साह आणि प्रेम पाहतच राहिलें आहे. साडेअकरा वर्षे झालीं माझी भारतांत अखंड पदयात्रा चालली आहे. त्यानंतर पाकिस्तानातील बंधूंना भेटावें अशी मला इच्छा झाली. कारण माझें प्रेम एखाद्या देशाच्या सीमेंतच अडकून राहिलेलें नाहीं. पाकिस्तान आणि भारत यांचीं शरीरें दोन असलीं तरी हृदय एकच आहे. हिंदु विद्यार्थ्यांच्या बगाली वमिक पुस्तकांतील एका गुरी मश्शालाच्या

कवीची कविता माझ्या पाहण्यात आली त्यात म्हटले आहे जाती, देश या दोन्हीपेक्षा माणुसकी उच्च आहे. ही कविता वाचून मला फार आनंद झाला. कारण ही तर माझ्या मनातलीच गोष्ट होती. म्हणूनच मी 'जयजगत्' म्हणतो. सगळे म्हणतात आमच्या देशाचा जय असो पण केवळ माझ्या देशाचाच नव्हे तर सर्व देशाचा जय असो असे मी म्हणू इच्छितो. गेल्या महायुद्धात कोटयावधी लोक मेले आणि किती जखमी झाले त्याचा हिशेबच नाही दोन्ही पक्षाचे लोक एकाच धर्माचे-ख्रिश्चन धर्माचे-होते. दोन्हीकडचे लोक आमचा जय व्हावा अशी परमेश्वराची प्रार्थना करीत. आता त्या बिचाऱ्या परमेश्वराने काय करावे ? लढाईत एकाचा जय म्हणजे दुसऱ्याचा पराजय, आणि ते दोघेहि देवाचे भक्त ! खरे म्हणजे अशी प्रार्थना होऊच शकत नाही माणूस माणसाबरोबर ल्ढताना ईश्वराची भक्ति करूच शक्त नाही आईला दहा मुलगे असले, त्यातील पाच एका बाजूला आणि पाच दुसऱ्या बाजूला होऊन लढू लागले आणि 'तुमचा जय होवो' असा आशीर्वाद तू आम्हाला दे म्हणून ते दोन्ही पक्षातील भाऊ तिची विनवणी करू लागले तर त्या बिचाऱ्या आईने कोणाचे ऐकावे ? आई सांगेल माझा आशीर्वाद तुम्हाला हवा असेल तर प्रथम तुमची ल्ढाई थांबवा. गुरुदेव रवींद्रनाथ टागोर म्हणत— लोक म्हणतात 'वंदे मातरम्.' परंतु 'वंदे भ्रातरम्' असे कोणी म्हणत नाही. भाऊ भाऊ देवाचे नाव घेऊन ल्ढू लागले तर तुमची भक्ति खोटी आहे असेच देव त्याना सांगेल. कुराणात लिहिले आहे की, इमान नुसते असून उपयोगी नाही, ते अमलात आणले पाहिजे सत्य बोलावे दु खी माणसाला मदत करावी असे केलें तरच तुम्ही खरी भक्ति करता असे ईश्वर म्हणेल हजरत महमदाने सांगितले आहे. जे लोक थोडा हि उपकार न करता लोकाना दाखविण्या-साठी पाच वेळा नमाज पढतात त्याना अल्ला सांगेल तुम्ही माझे खरे भक्त नाही

लोक मला विचारतात तुम्ही येथे का आला ? तुमचे भारतातले काम संपलें का ? मी त्याना सांगतो माझें काम प्रेमाचे काम आहे. सगळयावर माझें प्रेम आहे हें प्रेम देश-विदेश, हिन्दु-मुसल्मान

असले मद मानीत नाही पूर्व दिशेला तोड करून ईश्वराचे नाव घ्यावे की पश्चिमेकडे तोड करून घ्यावे ह्या वरवरच्या गोष्टी आहेत अत - करणात काय आहे तीच प्रमुख गोष्ट होय आपण सर्वांना फसवू शकू परतु ईश्वराला फसवू शकणार नाही धर्म तेवढाच सत्य आहे बाकी सर्व वरवरच्या गोष्टी आहेत म्हणूनच कुराणात म्हटले आहे सर्वांच्यावर प्रेम करा प्रेमात काही फरक करू नका आपलाच मार्ग श्रेष्ठ आहे, दुसऱ्याचा हीन आहे असे म्हणाल तर तुम्ही स्वत लाच हीन करून टाकाल कोणी दाढी राखतात कोणी राखत नाहीं कोणी प्रेताच दहन करतात कोणी दफन करतात हे वेगळेपण वरवरचे आहे आत सत्य एकच आहे आणि ते सत्य म्हणजे प्रेम

सगळ्याच्या अत करणात प्रेमाची ज्योति असते तिचा अस्पष्टसा प्रकाश तुम्हाला दिसला तर तुम्ही निश्चितच भूमिदान कराल ज्याना ती जमीन मिळेल त्यानीं स्वत त्या जमीनीत शेती केली पाहिजे त्याना ती विकता येणार नाही गहाण टाकता येणार नाही ज्याना जमीन मिळल त्यांना बी नागर वगैरेची मदत दिली पाहिजे कन्यादान करताना मुलीला आणखीहि काही वरदक्षिणा द्यावी लागते ज लोक भूमिहीनासाठीं जमीन मागतात त्याच्या मनात गाढ विश्वास असला पाहिजे की, जनता म्हणजे कल्पतरु आहे तुम्ही मागाल त तिच्यापासून मिळेल लोकाच्या हृदयात प्रेम आणि करुणा आहे हा विश्वास ठेवून जमीन मागीतली तर मिळल

यानतर मौन प्रार्थना झाली प्रार्थनासभेनतर दोन दानें मिळाली

---

# भूदानाचें काम हें युनियन कौन्सिलचेंच काम होय,

: ७ :

[ दिवस सातवा, अकरा सप्टेंबर. पागा ते तिस्ता, अंतर ९ मैल ]

विनोबाजी रात्री रोज साडेसात वाजता झोपतात आणि पहाटे दोन वाजता उठतात. त्याप्रमाणे आज येथें सर्व लोकहि उठले. सामानसुमान बांधून झालें. शौच्यादि आटोपून बाबा बैठकीवर बायबल वाचत बसले होते. तीन वाजता पदयात्री दलातील सर्व लोक तेथें येऊन उभे राहिले आणि आशादेवीच्या नेतृत्वाखाली 'भुवनेश्वर हे' हें गाणें सर्वांनी मिळून म्हटलें. त्यानंतर आम्ही सार्वांनी एक एक जणानें त्यांना प्रणाम केला. आज बाबाचा अडुसष्टावा वाढदिवस होता.

साडेतीन वाजता यात्रा सुरू झाली सुमारे साडेसात वाजता मुकामाची जागा तिस्ता हायस्कूल येथें पोहोचलो ते ठिकाण अगदी रेल्वे स्टेशन-जवळच होतें. परंतु वाटाड्यानी रेल्वे लाईन सोडून वेगळ्या रस्त्यानें गावातून पदयात्रा मुक्कामाचे ठिकाणी आणली. गावात प्रवेश होताना एका थोर मुसलमान गृहस्थाने बाबाचे स्वागत केले. रस्त्यात दोन्ही बाजूला हिन्दुमुस्लीमाच्या लहान लहान मुली हातात माळा घेऊन ओळीनें उभ्या होत्या आणि एक नवीन रचलेलें स्वागत गीत म्हणत होत्या. त्या ठिकाणी बाबा थोडे उभे राहिले गाणे म्हणून झाल्यानंतर मुलीनी बाबाना पुष्पमाला अर्पन केल्या थोड्या वेळाने मुक्कामावर येऊन पोहोचलो.

आज बाबाचा अडुसष्टावा वाढदिवस होता. रंगपूरचे डेप्युटी कमिश्नर मि. याकुबअल्ली खान, पोलीस सुपरिंटेंडेंट मि. अब्दुल हाई, कुडीग्रामचे S. D. O. साहेब. आणि विस्थेक ऑफीसर तेथें आले आणि त्यानीं बाबाच्या वाढदिवसाप्रीत्यर्थ आपली शुभेच्छा प्रदर्शित करून त्याना दीर्घायुष्य लाभावे अशी देवाची प्रार्थना केली. गेल्या वर्षी भारतात आसाम-प्रान्तें त्यांचा जन्मदिवस पाळण्यात आला होता. आज पाकिस्तानच्या पदयात्रेत त्यांचा जन्मदिवस साजरा करण्याचा शुभयोग आम्हाला लाभला.

पूर्व पाकिस्तान सरकारनें आपली शुभेच्छा आणि विनोबाना दीर्घायुष्य लाभावे अशी कामना विनोबाना तारेनें पाठविली.

दुपारी गावातील काहीं मडळी बाबाना भेटायला आली. त्यात येथील एक डॉक्टर होते. त्याचा परिचय देत मी बाबाना म्हणालों—हे इथले डॉक्टर आहेत. तुमचे कुराण-सार पाहण्याची त्यांची फार इच्छा आहे.

बाबा त्याना म्हणाले, "तें पुस्तक तर अजून छापून झाले नाही. छापावयाचे काम चालू आहे."

"आता आयुष्याचा शेवट जवळ आला आहे. आताच अनुवाद पहायला मिळता तर बरें. मला तो पाहण्याची फार उत्सुकता आहे."

"छापून झाल्यावर आपणाला पहावयास मिळेलच. थोड्या दिवसातच पुस्तक प्रसिद्ध होईल."

"बरें आहे. मी माझा पत्ता आपल्याजवळ देऊन ठेवतो. आपण एक पुस्तक मला पाठवावें. आपण कुराणशरीफचा अनुवादच केला असेल."

"नाही, मीं अनुवाद केला नाहीं. कुराणातून वेगवेगळ्या विषयांवर जीं वचनें आहेत तीं विषयाला धरून एकत्र केली आहेत. उदाहरणार्थ अल्ला-संबधीं जीं वचनें आहेत ती एके ठिकाणीं, पैगंबरसंबंधीं जी वचनें आहेत तीं एके ठिकाणीं अशी रचना आहे."

"तें पुस्तक आम्हाला वाचायला मिळेल अशी मी आशा करतों. आणि आणखी एक विनंति आहे. आमचें जीवन नीट चालावें असा आपण मला दुवा द्यावा."

* * *

हल्लीं या ठिकाणीं कुराणसार संबंधीं बरीच उत्सुकता दिसून येत आहे. यात्रेच्या पहिल्याच दिवशीं वृत्तपत्रवाल्यांनीं या विषयीं प्रश्न विचारला होता तेव्हां बाबा हसून म्हणाले "माझ्या या पुस्तकाचा तर पाकिस्तानांत प्रचार होऊन गेला आहे. मी तें पुस्तक बरोबर आणलेलें नाहीं. अजून छापूनहि आलेलें नाहीं. पण त्यापूर्वीच वर्तमानपत्रांत या पुस्तकावर टीका छापल्या गेल्या आहेत, पण मुख्य गोष्ट म्हणजे The Proof of the Pudding is in eating."

एक जण म्हणाला–"ते पुस्तक येथें आणायला पाकिस्तान सरकारनें मनाई केली आहे का ?"

बाबा म्हणाले "ते पुस्तक जर इस्लामविरोधी असेल तर भारतसरकार देखील या पुस्तकावर बंदी घालील कारण भारतातहि पाच कोटी मुसलमान आहेत आणि जर पुस्तक इस्लामविरोधी नसेल तर ते पुस्तक दुनियाभर चालेल. 'कुराणसार' पुस्तकाची जाहिरात तर खूपच झालेली आहे."

* * *

दुपारी ११॥ वाजल्यानंतर विद्यालयाच्या प्रांगणात आम्ही सर्व बाबांच्या जवळ जमलो. त्यांच्या जन्मदिनानिमित्त पूर्वी योजल्याप्रमाणे प्रार्थनेची व्यवस्था झाली होती. या कार्यक्रमात गावातील लोक, बरोबरचे सरकारी अधिकारी आणि वर्तमानपत्रकर्ते यांनी भाग घेतला. प्रथम विद्यालयातील एका शिक्षकाने कुराणपठण केले नंतर पदयात्रेंतील कार्यकर्त्यांनी गीतेचा बारावा अध्याय म्हटला नंतर वेगवेगळ्या भाषेंतील कित्येक भजने गायिली गेली गांधीजीचे आवडते गुजराथी भजन 'वैष्णव जन तो तेने कहिये' आणि तुकारामाचा अभंग 'जेथें जातो तेथें तू माझा सांगाती" गाईले गेले. त्यानंतर कानडी, असमी भजनें झाल्यावर सर्वांत शेवटी रवींद्रनाथ यांचे 'तोमार आशीर्वाद हे प्रभु तोमार आशीर्वाद' हें भजन म्हणण्यात आलें

भजन संपल्यावर थोडा वेळ विनोबा स्तब्ध बसले आणि नंतर त्यांनी कुराणातील 'अल फातेहा' सुरावर म्हटला नंतर असमी भाषेंतील नामघोषावरून एक भजन म्हटले.

त्यावेळी त्यांच्या डोळ्यांतून भक्तीच्या अश्रुधारा वाहू लागल्या होत्या. गाणे संपल्यावर दाटून आलेल्या कंठानें बाबा बोलू लागले.—

## मी समाजाचे ऋण फेडीत आहें

"ईश्वराच्या नावाचें स्मरण करण्याला सर्वकाळ चांगले'च आहेत. पण आज त्याचे नामस्मरण करण्यासाठीं एक विशेष निमित्त मिळालें आहे. जगाचा इतिहास पाहिला तर असे दिसून येतें कीं, ज्या ठिकाणीं माणूस आहे त्या ठिकाणी पुण्यकार्यं घडते तसेच वाईट कामहि होते. मनुष्यांत

नमाजाची वेळ सध्याकाळी ५ वाजता असते. त्यापूर्वी सभेचे काम सपावे म्हणून नेहमी प्रार्थनासभा चार वाजता होते. आजच्या सभेचे स्थान हायस्कूल आणि स्थानिक मदरसा याच्यामधील प्रागण होते. याच ठिकाणी एक सुदर मशीद आहे मशीदीच्या इमामानें सागितलें "मशीदीत ४॥ वाजता 'आजान' दिला जातो आणि दहा-पधरा मिनिटात नमाज सपतो. म्हणून सभेची वेळ ५ वाजता ठेवल्यास बरे होईल" विनोबानी आनदानें समति दिली

आजपर्यंत ज्या सभा झाल्या त्यात आजच्याएवढी विराट सभा पूर्वी झाली नाही. सभेची व्यवस्था उत्तम होती सभेला सुमारे पधरा हजाराहून अधिक लोक हजर होते विनोबानी सागितले—

## नगद धर्माचे पालन केले पाहिजे

"आपले प्रेम आणि उत्साह पाहून मला फार आनन्द होत आहे. आज आमच्या पाकिस्तान-यात्रेचा सातवा दिवस आहे आता नऊ दिवस उरले आहेत. पहिल्या दिवसापासून लोकसागराला भरती येत आहे. गेल्या साडे अकरा वर्षांत भारतामध्यें तीस हजार मैलापेक्षा अधिक पदयात्रा झाली आहे आणि जन्माच्या अखेरपर्यंत याप्रमाणेच देवाचे काम करीत राहीन. भारतात जो उत्साह आणि प्रेम मला दिसले तसेच येथेहि दिसत आहे. भारतात मोठमोठ्या सभा झाल्या. येथील सभा पण त्यापेक्षा कमी नाहीत माझ्या विषयी तुमच्या मनात मला प्रेम दिसत आहे. परतु प्रेम दाखविणे ही एक गोष्ट आहे आणि त्याचा प्रकाश कर्मांत दिसणे ही गोष्ट वेगळी आहे केवळ इमान म्हणजे विश्वास असून चालणार नाही. त्याचा अमल झाला पाहिजे, त्याप्रमाणे आचरण झाले पाहिजे. आज एका गृहस्थानें एक चागला प्रश्न विचारला आहे ते म्हणाले, देशाच्या उन्नतीसाठी इडस्ट्रीयलायझेशन झाले पाहिजे. अर्थात् मोठे कारखाने उभारले पाहिजेत. मी त्याना म्हणालो तसे करावयास माझी मनाई नाही. गेल्या १५ वर्षांत लोकसख्या पुष्कळ वाढली आहे पण त्या प्रमाणांत उद्योग वाढले नाहीत. भारतात नाहींत पाकिस्तानांत हि नाहीत. तेव्हा प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, कामाच्या अभावीं भुकेनें पिडलेल्या लोकासाठी आजच आपण कांही करू

शकतो की नाही? समजा इंडस्ट्रीयलायझेशन व्हायला १० वर्षे लागणार असतील तर मग आपण भुकेल्या व्यक्तीला 'तुम्ही तोपर्यंत थांबा दहा वर्षांनंतर तुमची व्यवस्था करू' असे सांगणार का? अशा तऱ्हेचा धर्म चालेल का? आम्हाला नगद, तावडतोबीचा धर्म पालन केला पाहिजे. आज गूळ खाऊ आणि मेल्यानंतर त्याची गोडी मिळेल असे होते का? गूळ खात असतानाच तो गोड लागतो. धर्माचे हि असच आहे. आपण रोज अन्न खातो त्याप्रमाणेच दुसऱ्याना हि आजच खावयाला मिळावयाची व्यवस्था झाली पाहिजे. आपल्याकडे एखादा भुकेला माणूस आला, त्याला आपण खावयाला दिल काहीं वेळ गेल्यानंतर त्याला पुन्हा भूक लागेल. तेव्हा त्याला पुन्हा खावयास द्यायला नको का? अशाप्रकारे वरचेवर त्याला खाऊ घालू लागलो तर त्याचा आळस वाढेल आणि मनुष्यत्व नष्ट होईल. म्हणून त्याला उपजीविकेचे साधन दिले पाहिजे. ते साधन म्हणजे जमीन. त्या जमीनीत तो आणि त्याच्या घरचे लोक श्रम करतील आणि खातील भूदान हे कोण्या एका विशिष्ट देशासाठी नाही, सर्व देशासाठीं आहे. विशेषत आशियातील देशाना ते आवश्यक आहे. या ठिकाणीं जमीन कमी आहे, लोकसंख्या ज्यास्त आहे, आणि उद्योगधंदे कमी आहेत. हा भूकेचा प्रश्न हिंसेच्या मार्गाने सोडवू लागलों तर सर्व नाश होईल. प्रेमाच्या मार्गानेच हा प्रश्न सुटेल इस्लामचा अर्थ आहे शांति. पण पोटात भूक असल्यावर शांति कोठली? म्हणून प्रथम पोटात शांति असली पाहिजे, मग चित्ताची शांति लाभेल. इस्लामने 'सर्वांना खावयास दिल्यानंतर खावे' असे सांगितले आहे. दुःखी लोकांची सेवा आणि भगवताचे नाव घेणे हेंच सर्व धर्मांचे सार आहे

## प्रेमाची ज्योत पसरली

तुम्हांला भारतातल्या चंबळ खोऱ्यातल्या डाकूंची कथा सांगतो. दोन वर्षांपूर्वी आम्ही त्या भागात गेला होतों. गेली ५० वर्षे त्या भागात दरवडे पडत असल्यामुळें तो दरवडेखोरांचा मुलुख असे समजले जावें. सरकारने त्यांच्या बंदोबस्तासाठीं पोलीस पाठविले. पोलीसांच्या हातांत बंदुका दिल्या. डाकूंच्या हातात हि बंदुका होत्या. तिघले हीमगाई हों

त्याच्या हातात हि बदुका होत्या. त्या तीघाच्या हातातल्या बदुकानी तेथें शाति स्थापन होणार होती का ? आम्ही परमेश्वराचे नाव घेऊन त्या ठिकाणी गेलो. त्या दरवडेखोराना भेटलो. त्याना म्हणालो तुम्ही कोणत्या मार्गाने घन गोळा करीत आहात? माणसाची हत्या करून लूट मिळविली तर त्यामुळें तुमच्या मनाला शाति मिळेल का ? मेल्यानतर हि शाति मिळेल का? आमच्या बोलण्याचा दरवडेखोराच्या मनावर परिणाम झाला. तेव्हां वीस दरवडेखोरानी आपल्या शस्त्रासह आत्मसमर्पण केले आम्ही त्या शस्त्रासमेत त्याना सरकारच्या स्वाधीन केले. त्याच्या जवळ टेलेस्कोप लावलेल्या आधुनिक पद्धतीच्या अनेक मौल्यवान रायफली होत्या. दरवडेखोराना पकडून देण्यासाठी सरकारनें मोठमोठी बक्षिसें जाहीर केली होती. या भयकर दरवडेखोरानी कसे आत्मसमर्पण केले ? त्याच्या हृदयातली प्रेमाची ज्योति झाकळलेली होती. तिला स्नेहाचा पुरवठा मिळताच त्याच्या हृदयात प्रकाश पडला.

## भूदान हें बेसिक डेमॉक्रसीचे काम आहे

अशा प्रकारे लोकाच्या हृदयाला स्पर्श करायला पाहिजे. जनतेमध्यें आळस असतो. आपल्या सर्वांचा स्वभाव च असा आहे की आपण होऊन कोणी दान करायचा नाही. कोणी याचक आलाच तर त्याला देतील, परतु ते सारे कोणी मागेल तेव्हा! म्हणून मागण्यासाठीं सुद्धा लोक हवेत. लोक मला विचारतात तुम्ही येथून गेल्यानतर हें काम कोण चालवील ? मी त्याना म्हणतो हे तुमचे बेसिक डेमॉक्रसीचे सभासद आहेत ते हें काम चालवितील अशी मला आशा आहे. हे मेंबर जर भूदानाचे काम हाती घेतील तर भूदानयज्ञ सार्थक होईल. ईश्वरानेंच अशी व्यवस्था केली आहे की भूदानाचे हें काम युनियन कौन्सीलच्या सभासदानी करावे. त्यांनी स्वत दान द्यावे दान देण्याची आणि मिळविण्याची त्याना सदिच्छा असणार नाही तर बेसिक डेमॉक्रसीचे सदस्य व्हायला त्याना कशी योग्यता प्राप्त होईल ? हें काम प्रेमाचे, सेवेचे, करुणेचे आहे.

या नतर पाच मिनिटें मौन प्रार्थना झाल्यानतर सभा आटोपली. आज एकूण १६ विघे भूदान मिळाले.

[ दिवस आठवा, १२ सप्टेंबर, तीस्ता ते मोरबाग आठ मैल ]

पहाटे साडेतीन वाजता यात्रा सुरू झाली तीस्ता येथें कुडीग्राम तालुका संपला, म्हणून तेथील जबाबदार सरकारी अधिकाऱ्यांनीं निरोप घेतला नवीन तालुक्याच्या अधिकाऱ्यांचा परिचय झाला तीस्ता येथील विशेष गोष्ट म्हणजे स्थानिक मुसलमान लोकांनीं आणि शाळेंतील शिक्षक-विद्यार्थ्यांनी बाबाच्या स्वागताची जबाबदारी उचलली होती ते सर्व दिवसभर त्या जागी उपस्थित होते त्यामध्यें एक पदवीदान घेतलेला शांत चेहऱ्याचा अधिकारीहि होता हे सर्व लोक निरोप देण्यासाठी पहाटे हि हजर होते

यात्रा सुरू झाली कृष्णपक्षाची त्रयोदशी होती गाढ अंधकार होता काहीं वेळ रेल्वेच्या बाजूनें चाललो तीस्ता येथें रेल्वेपुलाजवळ नावेंत जाऊन बसलों तीस्ता नदी बरीच मोठी आहे. पाण्याला बराच जोर आहे. पुलाजवळ भोवरे होतात या ठिकाणीं दिवसादेखील नाव चालविणें कठिण असतें निळ्या आकाशात तारका चमकत होत्या नदीच्या पाण्यांत त्यांची पडछाया पडली होती नावेंत बसून बाबा आकाशांतील ताऱ्यांची माहिती देत होते एकदोन एका लहानशा भोवऱ्यानें नाव फिरली आणि पुलाच्या खांबावर एकदोनदा आपटली परंतु नावाडी नाव चालविण्यात कुशल होते त्यांनीं नाव सुखरूप पोहोंचविली

## सर्व धर्म शांतीचीच घोषणा करतात

"वार्तेत लोकानी भगवताचे नामसकीर्तन केले. खूप आनद झाला. या कीर्तनात तीन नावे होती. राम-कृष्ण-हरि. राम आपल्याला आनद देतो, कृष्ण आपले मन आकर्षण करतो आणि शेवटी हरि आमचे प्राण हरण करून शाति देतो. परतु ही तिन्ही नावे एकाच ईश्वराची भिन्नभिन्न नावे आहेत. इस्लाममध्येंहि 'अल्ला' एक असे म्हटलें आहे, पण त्याला नावे अनेक आहेत माणूस आपापल्या आवडीप्रमाणे ईश्वराला वेगवेगळी नावे देत असतो. परतु सगळयानी मिळून जर भगवताचे नाव घेतले तर सर्वांची हृदयें जोडली जातील एकच नाव घ्यायचे तर ते शाति हें घ्यावे. हिन्दु लोक रोज शाति-मत्राचा उच्चार करतात. इस्लामचा अर्थच मुळी शाति आहे. मुसलमान माणूस कोणाला भेटल्यास 'असलाम आलेकूम्' म्हणून अभिवादन करतो. याचा अर्थ 'आपल्याला शाति लाभो' असा आहे. आणि दुसराहि शातिची कामना करूनच परत नमस्कार करतो. ख्रिस्ती धर्मातहि म्हटले आहे की, Grace be unto you and peace foom God ईश्वराकडून तुमच्यावर करुणा आणि शाति याचा वर्षाव होवो सगळया धर्मामध्येंच शातीची घोषणा आहे. आज केनेडी आणि क्रुश्चेव शातीच्याच गोष्टी बोलत आहेत. परतु शस्त्रसज्ज झाल्याशिवाय शाति होणार नाहीं असे त्याना वाटते. ही विश्वशातीची समस्या एक मोठी समस्या आहे आणि दुसरी समस्या भुकेची आहे. एक भुकेची शाति पाहिजे आणि दुसरी चित्ताची शाति पाहिजे

गावातल्या लोकाचे दु ख गावातले लोक जर दूर करणार नाहीत तर दुसरे कोण करील ? एखाद्याचा मुलगा आजारी पडला तर स्वास्थ्य-मत्र्याला 'लवकर औषधें पाठवा' असा टेलिग्राम करील का ? आणि जोपर्यंत त्याची मदत येणार नाही तोपर्यंत स्वस्थ बसेल का ? त्याला गावात जी मिळेल ती औषधयोजना करावी लागेल.

आमच्या खाण्या-जेववण्याची व्यवस्था येथें उत्तम होते पण ती आम्हाला गोड लागत नाही. जर तुम्ही गरीबासाठी काहीं करणार नाही

तर ती सारी व्यवस्था कडूच वाटेल. आपण सगळेजण एकत्र बसून गरीबासाठी किती जमीन देऊ शकता याचा विचार करा."

आजचे मुक्कामचे ठिकाण फारच लहान होतें. गाव हि छोटेसे होतें स्थानिक लोक मधून मधून बाबाना भेटत होते. त्यांच्या बरोबर भूदानाची चर्चा करत होते.

एकानें बाबाना विचारले 'मुक्ति तर सर्वांनाच पाहिजे असते केवळ एकटयानेंच मुक्ति मिळविणे शक्य आहे का ?'

बाबा म्हणाले—"मुक्ति ही. कांही बाहेरुन मिळविण्याची वस्तु नाहीं, ती नेहमीं आपल्या समोरच असते. तिला केवळ ओळखायचे आहे. मुक्ति जर मिळण्याची वस्तु असेल तर ती केव्हांच मिळणार नाही मुक्ति म्हणजे वस्तुत काय आहे ? मुक्ति म्हणजे अहंकारांतून मुक्ति, विकारांतून मुक्ति. ज्या ठिकाणी मुक्ति मिळविण्याची चिंता असते त्या ठिकाणीं अहंकार असतो. त्या ठिकाणी मुक्ति असतच नाहीं ज्या ठिकणी अहंकारांतून, विकारातून मुक्ति होते त्या ठिकाणीं मुक्ति राहते "

सध्याकाळीं ४ वाजता नेहमींप्रमाणे प्रार्थना सभा झाली. गांव लहान असले तरी सभेला जोर पुष्कळ आले होते. या लहानशा गांवात हि पांच दानपत्रें मिळालीं.

## माता, पिता, शिक्षक आणि साहित्यिक हेच समाजाचे मार्गदर्शक : ९ :

[ दिवस नववा, १३ सप्टेंबर मीरवाग ते रगपूर, आठ मैल. ]

पहाटे तीन वाजता यात्रा सुरू आली. चालताना वाटेत क्रमशः गर्दी वाढू लागली. रगपूरच्या हद्दीवर रगपूरच्या प्रमुख व्यक्तींनी बाबाना हार घालून त्याचे स्वागत केले पाकिस्तानच्या राष्ट्रीय परीषदेचे सदस्य जनाब मसीहूर रहमानसाहेब याच्या घरी मुक्कामाचे ठिकाण होते. तेहि या ठिकाणी हजर होते. येथून मुक्कामाची जागा अद्याप तीन मैलावर होती. येथून मुक्कामापर्यंत उत्तरोत्तर गर्दी वाढत गेली आणि त्यामुळे बाबाना चालण्यास अडथळा होऊ लागला मुक्कामापासून अर्ध्या मैलावर असताना बराच जोराचा पाऊस सुरू झाला लोक धावू लागले. मात्र बाबा आनदानें पावसात भिजत मजेनें चालले होते. त्याच्याबरोवर तेव्हा जलदीनें चालणे कठिंण होतें सुमारे साडेसात वाजता ओल्याचिंब स्थितीत मुक्कामाला पोहोचलो. अशा पावसातहि मुक्कामाच्या जागेच्या मोकळ्या मैदानात पुष्कळ लोक उभे होते. एक 'रवींद्र-सगीत' गाऊन स्थानिक लोकानीं बाबाचे स्वागत केलें. त्या नतर बाबानी थोडें भाषण केलें, त्याचा साराश असा–

"जास्त बोलण्याची ही वेळ नाहीं वरून पाऊस पडत आहे. त्या पावसाच्या धारा म्हणजे ईश्वराच्या आशीर्वादाची वृष्टि आहे असे मला वाटते हें युग विज्ञानयुग आहे आता सर्व देशानीं एक होणे अवश्य आहे विज्ञानानें पृथ्वीवरील देशामध्यें बाह्य अतर कमी केले आहे. पण अंतरी अतर मात्र वाढले आहे याचा परीणाम असा झाला आहे की, एक तर आपण सर्वांनी प्रेमानें एकत्र रहायला शिकलें पाहिजे, नाहीं तर सर्वांच्या एकत्र नाशासाठी तयार राहिले पाहिजे. आता सर्वांत मोठी समस्या म्हणजे विश्वप्रेमाची आणि विश्वशातीची आहे. म्हणूनच मी 'जयजगत' असे म्हणत असतो."

* * *

आजच्या मुक्कामाचे गाव रंगपूर शहर बरेच मोठें आहे सकाळीं स्वागतासाठी हि पुष्कळ लोक हजर होते एका मोठया वाडयात आजचा मुक्काम होता सकाळपासून भेटीसाठी लोक सारखे येत होते साहित्यिक, वकील यांच्याशी चर्चा झाल्या शहरातील सगळया वर्गांतील बुद्धिमान् लोक उपस्थित होते आणि दर्शनाला येणाऱ्या लोकांची तर सीमाच नव्हती दुपारपासून ते येऊन बसले होते आज वकीलाच्या बरोबर चर्चा झाली चर्चेत भाग घेणारे बरेच तरुण लोक होते त्यांच्याशी चाललेली प्रश्नोत्तरी थोडक्यात अशी–

प्रश्न—पूर्व पाकिस्तानात जमीन कमी आहे आपण भारत सरकारला सांगून भारतातील काही जमीन पाकिस्तानच्या लोकांना देऊ शकाल काय?

उत्तर —खूप चांगला प्रश्न आहे हा हाच प्रश्न भारतातहि आहे या समस्येचें उत्तर केवळ प्रेमातच सापडणार आहे म्हणून ज्या त्या देशाचे प्रश्न त्या त्या देशात प्रथम आपापसात प्रमानें मिटविले पाहिजेत हा जो जमीनीचा प्रश्न आहे तो सर्व आशिया खंडाचा आहे

प्रश्न कर्ता म्हणूनच तर आपण भारत-सरकारला तसें सांगावे

विनोबा– ही गोष्ट One sided होऊ शकत नाही पश्चिम पाकिस्तानात खूप जमीन पडली आहे येथल्यापेक्षा सहासात पट जास्त जमीन तेथें आहे पण तेथें हि हाच प्रश्न आहे म्हणून दोन्ही देशाचे फेडरेशन होईल तरच हा प्रश्न सुटू शकेल भूदान हा वेगळा विषय आहे आणि सरकारी अॅवदान हा वेगळा विषय आहे त्यासाठी वर्ल्ड फेडरेशनची जरूरी आहे मी 'जयजगत्' म्हणतो त्याचा परिणाम वर्ल्ड फेडरेशन हाच व्हावयाचा आहे

प्रश्न — साम्प्रदायिक समस्या केवळ आमच्या आणि तुमच्याच देशात आहे का ?

उत्तर — माझा तसा अनुभव नाहीं सामान्य लोकांत तसा भाव आहे असं मला वाटत नाही या देशात मला तसा दिसला नाहीं, भारतात हि दिसला नाही परंतु वेळोवेळी राजकीय प्रश्न उभे राहिले म्हणजे धार्मिक प्रश्न उभे करण्याची राजकीय लोकांना संधि मिळते असे दिसतें

प्रश्न:— आपण प्रेमाचा प्रचार करता मग जबलपूर, अलीगड आसाम येथें जे झगडे आले ते प्रेमाच्या विरुद्ध नाहीत का?

उत्तर:—ते तर माझ्या जीवन-दर्शनाच्या विरुद्ध आहेत असेच झगडे जगात पुष्कळच चालले आहेत. म्हणूनच तर प्रचाराची जरूर आहे आणि त्यासाठीच मी पायी फिरत आहे जगात काय चालले आहे हा प्रश्न नाही. जग कसे वाचेल हा प्रश्न आहे. भारतात शातिसेना सगठित केली जात आहे. ज्या ठिकाणी अशाति दिसून येते त्या ठिकाणी हे शातिसैन्य धावत जाते

यानतर रगपूरच्या साहित्यिकाशी चर्चा झाली विनोबा त्याना म्हणाले—

"आपण सगळे साहित्यिक आहात. यापुढे जगात साहित्यिकाचा महिमा आणखी वाढणार आहे प्राचीन काळापासून त्याचा महिमा चालत आला आहे. जगात किती तरी महाकवि होऊन गेले. ग्रीक भाषेत होमर, इग्रजीत मिल्टन, जर्मन भाषेत गॅटे, रशियन भाषेत टॉलस्टाय, फ्रेंच भाषेत व्हिक्टरह्यूगो बगालीमध्यें रवीद्रनाथ या सर्वानीं काव्य आणि साहित्य निर्माण केलें प्रत्येकानें आपापल्या भाषेत लिहले आहे. ज्या भाषेत त्याचे लहानपणापासून पालनपोषण झाले त्या भाषेत त्यानी लिहले. लहानपणापासून आईबाप शेजारी याच्याकडून जी भाषा मिळते त्याच भाषेत माणूस लिहतो हा साधारण नियम आहे विशेष परिस्थितीत या नियमाला अपवादहि असतो श्री अरविंद लहानपणीच विलायतला गेले म्हणून ते बगाली विसरले इग्रजी, फ्रेंच, लॅटिन, ग्रीक या भाषामध्यें तें अत्यत प्रवीण होते देशात परत आल्यावर त्याना परत बगाली शिकावे लागले ते गुजराथी, मराठी, तमिळ आणि सस्कृतहि शिकले सस्कृतचे त्यानी पुष्कळ अध्ययन केले तरीहि त्यानी वेद, उपनिषदें, योगसूत्रें यावर जें लिहिले आणि सावित्री नावाचे जें काव्य रचले, ते सर्व त्यानी इग्रजी भाषेत केले. ही एक विशेष घटना आहे. पण सामान्यतः स्वभाषेतच साहित्यिक रचना करतो. तरीपण तो आपल्या भोवतालच्या परिस्थितीच्या वर उठू शकतो हे त्याचे विशेष लक्षण आहे.

संस्कृत भाषेंत कवि शब्दाचा अर्थ क्रांतदर्शी असा आहे. म्हणजे ज्याला फार दूरचे दिसते तो. रवींद्रनाथांनीं जें कांहीं लिहिलें तें सर्व बंगालच्या परिस्थितींतच लिहिलें. त्यांच्या साहित्याचा बंगालवर फार मोठा प्रभाव आहे. साहित्याचा आणि सृष्टीचा संपर्क फार घनिष्ट असतो. रवींद्रनाथांचा पूर्व बंगालच्या सृष्टीशी आंतरिक संपर्क होता म्हणून त्यांच्या काव्यावर पूर्व बंगालचा हि प्रभाव आहे. तथापि रवींद्रनाथांचा Approach विश्वव्यापी होता. म्हणूनच त्यांचे साहित्य जगातील सर्वांना प्रिय झालें. आज जितके लोक त्यांचे साहित्य वाचीत आहेत त्यापेक्षा भविष्यकाळीं अधिक लोक वाचतील आणि त्यापासून त्यांना आनंद व स्फूर्ति लाभेल. कारण त्यांचे साहित्य कालातीत आहे. कालानें मर्यादित केलेलें तें नाहीं. ज्याचें चित्त स्थान, काल यांच्या बंधनांतून मुक्त असतें तोच साहित्यिक होऊं शकतो. ज्याचें मन स्थान आणि काल यांच्या सीमेंत बद्ध असतें तो फार तर आपल्या काळांत कांहीं थोडी प्रेरणा देऊं शकेल पण ती प्रेरणा टिकणारी नसते. साहित्यिकाचें मन स्थळ आणि काल यांच्या वर असलें पाहिजे याचा अर्थ असा नाहीं कीं, स्थळ आणि काल यांना तो मानीत नाहीं, किंवा त्यांसाठीं कांहीं करीत नाहीं. आपल्या स्थानाकडे आणि कालाकडे त्याची दृष्टि निश्चित असतेच परंतु त्याची आंतरदृष्टि स्थलातीत आणि कालातीत असते. जे श्रेष्ठ साहित्यिक असतात त्यांना प्रत्येक मनुष्याचें अतिगूढम दर्शन होऊं शकतें. आणि ते दुसऱ्याच्या चित्तविकारांचें मापनहि करूं शकतात. हें त्यांना कसें शक्य होतें ? याचें कारण असें कीं त्यांच्या स्वतःच्या चित्तांत विकार असत नाहींत. जे स्वतः विकारग्रस्त असतील तर त्यांच्याकडून दुसऱ्याच्या विकारांचें मापन यथार्थपणें होणार नाहीं. ज्यांना दुसऱ्याच्या चित्तविकारांचें साक्षी व्हायचें असतें त्यांनीं प्रथम आपल्या सर्व विकारांपासून मुक्त व्हायें पाहिजे. ते जर आपल्या स्वतःचेच राग गाऊं लागले तर त्यांना विश्वाचें दर्शन कसें होईल ? आपण समुद्राच्या तीरावर उभे असलों किंवा नावेंतून जात असलों तर आपल्याला समुद्राचें दर्शन होईल. परंतु आपण स्वतः जर समुद्राच्या पाण्यांत गटांगळ्या खात असलों तर आपल्याला समुद्राचें कसें दर्शन होईल ? आणि काव्यहि कसें स्फुरेल ?

आपण समुद्रापासून पृथक् असतो म्हणून च समुद्राचे यथार्थ दर्शन करता येते. म्हणून साहित्यिकाजवळ अलिप्तता असली पाहिजे. पण तो जर केवळ अलिप्त असेल तर तो सन्यासी होईल, जीवनमुक्त होईल, परंतु साहित्यिक होऊ शकणार नाही. तो विकारमुक्त असेल तरी देखील साहित्यिक होऊ शकणार नाही. तो जर विकारमुक्त पण ससारविमुख असेल तरीहि तो साहित्यिक होऊ शकणार नाही. जो ससाराभिमुख आहे आणि वर अलिप्त आहे तो च साहित्यिक होऊ शकतो. तो ससाराभिमुख असेल पण अलिप्त नसेल तर तो ससारी जीव होईल, साहित्यिक होणार नाही. आणि अलिप्त असेल पण ससाराभिमुख असणार नाही तर तो मुक्त होऊ शकेल, परंतु साहित्यिक होणार नाही साहित्यिकाची भूमिका ही अशा तऱ्हेची आहे असे मी मानतो

## ज्या भाषेत विश्वमानव प्रकट होईल तीच भाषा श्रेष्ठ

बगाली भाषा जगातील एक श्रेष्ठ भाषा आहे असे मी मानतो. कमीतकमी आठ कोटी लोकाची ती मातृभाषा आहे जगात अशा विशाल भाषाची सख्या फार मोठी नाही चीनी, जपानी, अरबी, जर्मन, फ्रेंच, रशियन, इग्रजी, हिन्दी, उर्दू अशा काही भाषा आहेत ज्या ५-७ कोटी-पेक्षा अधिक लोक बोलतात. जगात ज्या १०–१२ मोठ्या भाषा आहेत त्यात बगाली भाषा आहे जगात सुमारे हजारापेक्षा अधिक भाषा आहेत. बायबलचा अनुवाद सुमारे १००० भाषात झालेला आहे. जी भाषा अनेक लोक बोलतात तीच भाषा उन्नत असते अशी गोष्ट नाही. तर ज्या भाषेत विश्वमानव प्रकट होतो ती भाषाच उन्नत होय. हा आविर्भाव बगाली भाषेत झालेला आहे म्हणूनच बगाली भाषेला जगातील श्रेष्ठ भाषेत स्थान मिळाले आहे. इग्रजी भाषेइतके साहित्य बगालीत नाही हे खरे असले तरी तसे हळू हळू होईल परंतु मानवतेशी ज्याचा सबध आहे, असे साहित्य बगाली भाषेत आहे मानवतेवरूनच भाषेचा महिमा मोजला जातो.

कोणती भाषा अधिक लोक वाचतील व शिकतील असा मला प्रश्न विचारला जातो. त्याचे उत्तर मी देतो की 'जी भाषा विश्वशाति स्थापन करील

लढाया होओत, परतु त्यातले साहित्यिक जेव्हा एकत्र जमतील तेव्हा त्याना आपण सगळे भाऊ आहोत असाच अनुभव येईल या भ्रातृत्वाची जबाबदारी सर्वांच्यापेक्षा साहित्यिकावर अधिक आहे, कारण आज अणु-शस्त्राच्या योगाने मनुष्याच्या हातात जी महारशक्ति आलेली आहे ती जर मनुष्य वापरील तर जगाचा नाश होईल, साहित्याचा नाश होईल, माणसाचाहि नाश होईल या विज्ञानशक्तीला कोण मार्ग दाखवील ? साहित्यिकच दाखवू शकेल म्हणून भविष्याकाळी साहित्यिकाच महत्त्व पुष्कळ वाढणार आहे विज्ञानाची शक्ति तर मूढ आहे अग्नीनें ज्याप्रमाणे स्वयपाक करता येतो त्याप्रमाणे आग लावून घरहि जाळता येते अग्नि ही मढ शक्ति आहे तुम्ही जशी चालवाल तशी ती चालेल विज्ञानशक्ति हि जशी चालवाल तशी चालेल याचा अर्थ असा की, जग जर वाचायचे असेल तर शातिशिवाय दुसरा कोणताहि मार्ग नाही ही शाति कोण आणू शकेल ? जे क्षुब्ध न होता चिंतन करीत असतात ते च दीपस्तभाप्रमाणे जगाला मार्ग दाखवू शक्तील तुम्ही साहित्यिक जर क्षोभरहित होऊन चिंतन कराल तर हें सौभाग्य तुम्हालाच मिळणार आहे "

* * *

साहित्यिकाबरोबरच भाषण सपल्यावर बाबानी थोडा वेळ विश्राति घेतली स्थानिक लोकाच्या इच्छेवरून आजची सभा सायकाळी ५ वाजता झाली रगपूरला सभेसारखे मोठे मैदान असूनहि सभास्थान मुक्कामाच्या प्रागणातच करण्यात आले होत नुक्ताच पाऊस पडून गेला होता सभास्थान लहान आणि माणसाची गर्दी मोठी त्यामुळें गडबड फार झाली विनोबानीं थोडक्यातच भाषण आटोपले ते म्हणाले—

## माता-पिता, शिक्षक आणि साहित्यिक हेच हिंसेला विरोध करूं शकतील

गेले आठ दिवस आमची ही प्रेमयात्रा चालू आहे आजचा नववा दिवस आहे आता सात दिवस राहिले आहेत भारतात मी जें काम करीत होतो तच काम जे कांही दिवस मी येथें आहें तितके दिवस करीन तें काम म्हणजे सगळयाचीं हृदयें जुळवावयाची प्रेमाचा विस्तार करावयाचा

भूदान हें त्याचे एक अत्यंत आवश्यक साधन आहे जगात हल्लीं दोन मोठ्या समस्या आहेत एक समस्या भुकेची आणि दुसरी समस्या अणुशस्त्रत्यागाची एका बाजूला भूक छळत आहे अर्थात् देहामध्यें अशान्ति आहे आणि दुसऱ्या बाजूला विद्वेष आणि भय आहे म्हणजे चित्तात अशांति आहे या दोन्ही अशांतीपासून आज पृथ्वीची मुक्तता करणें हेंच आज सर्वांत मोठें काम आहे एका देशाला दुसऱ्या देशाविषयीं भय आणि संशय वाटत आहे जगात आज अमेरिका आणि रशिया दोन मोठी राष्ट्रें आहेत त्या दोघात भय आणि संशय सर्व देशांपेक्षा जास्त आहे, अगदीं पराकाष्टेला पोहोंचले आहेत त्या त्या देशातील वर्तमानपत्रें तेथील लोक वाचतात आणि त्यात जें काही लिहिलेलें असते ते सर्व सत्य आहे असे मानतात त्यामुळें जगात परस्परामध्यें भय, विद्वेष संशय निर्माण करण्याचा वृत्तपत्रें हा एक फार मोठा कारखाना झाला आहे सर्व ठिकाणी अशी दडपशाही आहे सगळ्यांची बुद्धि एका साच्यात घालायचा प्रयत्न केला जात आहे वर्तमानपत्रांच्या प्रचारामुळें एका देशातील मुले दुसऱ्या देशातील लोकांना राक्षस समजतात ते विसरतात की दुसऱ्या देशातहि आमच्यासारखीच माणसें आहेत आणि त्यानाहि हृदय आहे आमच्या देशातील माणसांच्या अंतःकरणात जसें प्रेम आणि करुणा आहे तशी त्यांच्यातहि आहे हिंस्र श्वापदापासून वाचण्यासाठी माणूस बदूक वापरतो परंतु माणसाला माणसाचें इतके भय वाटत की त्यानें त्यासाठी अणुशस्त्रें निर्माण केली आहेत. आता विचार करा आपण मानव इतके भयंकर प्राणी आहोत का कीं ज्यामुळें त्याच्यात हिंसा उद्वेग भय याचा प्रवाह चालावा? ह्या प्रवाहाचा प्रतिरोध कोण करू शकेल? घरातील आईबाप करू शकतील, विद्यालयातील शिक्षक करू शकतील आणि करू शकतील साहित्यिक या तीन शक्तीच मनुष्याला वाचवतील बाप मुलाला विचारतो तू वेळेवर शाळेंत जातोस ना? भीतीनें मुलगा खोटें बोलतो कारण तो वेळेवर शाळेला गेलेला नसतो आणि आपण सत्य बोलला तर बाप आपल्याला मारणार असे त्याला वाटतें याचा अर्थ असा की, बाप मुलाला नियमपालनाचे शिक्षण देतांना त्याबरोबरच भयाचेंहि शिक्षण देत असतो मुलाला नियमानें चालण्याचे शिक्षण देण्यात त्याची निर्भयता मात्र नष्ट केली एक पैसा मिळवला पण

एक रुपया गमावला ! मुलाला बापाकडून भीतीचे शिक्षण मिळाले. पुढें तो पोलीसाला भिऊं लागतो, सरकारी ऑफीसरला भिऊ लागतो. निर्भयतेशिवाय यथार्थ प्रेम होऊ शकत नाही म्हणून हे विश्वशांति स्थापन करण्याचे काम घरातून शाळेंतून सुरू झाले पाहिजे. मुलाला बुद्धीचे स्वातंत्र्य दिले पाहिजे. माझें म्हणणे तुला पटले नाही तर मानू नकोस असेच नेहमी सांगितले पाहिजे. परंतु सर्व राष्ट्रांत याच्या अगदी विरुद्ध शिक्षण दिले जात आहे. आणि विद्यालयांतून मुलांना एका साच्यात घालण्याचा प्रयत्न चालू आहे. बुद्धीचे स्वातंत्र्य कोणत्याहि देशात नाही. हे स्वातंत्र्य पुन्हा स्थापित करावयास हवे. त्यासाठी मुख्य गोष्ट म्हणजे प्रत्येक गावानें सर्व दिशेनें आपल्या पायावर उभें राहिले पाहिजे. जेव्हा गावात आत्मनिर्भरतेची शक्ति किंवा स्वावलंबनाची शक्ति येईल तेव्हाच जगात सर्व देशामध्यें परस्परांत प्रेम उत्पन्न होईल आणि मग ते एकमेकांना सहाय्य करतील. जगात शांतिस्थापन करण्याचे काम मातापिता शिक्षक आणि साहित्यिक यांच्यावर अवलंबून आहे."

सभेनंतर पांचमिनिटें मौनप्रार्थना झाली.

दर्शनोत्सुक लोकांची गर्दी होतीच. मशीहूररहमानसाहेब बाबांना येऊन भेटले आणि त्यांनी १० विघे जमीनीचे दानपत्र लिहून बाबांच्या हातीं दिले. एका गुजराथी मुस्लीम महिलेनें विनोबांबरोबर गुजराथींत भाषण केले. तिला बाबांचा आशीर्वाद म्हणून एक माला पाहिजे होती. बाबांनी तिच्यावर हात ठेवून बाबा तिला म्हणाले 'ईश्वरावर श्रद्धा ठेवून प्रतिज्ञा कर कीं मी कधी असत्य बोलणार नाहीं.' त्याप्रमाणे ती बोलल्यावर बाबांनी तिच्या हातावर थाप मारून तिच्या गळयात माळ घातली. बाई खूप होऊन गेली व विनोबांना नमस्कार करून तिनें निरोप घेतला.

रात्रीच्या प्रार्थनेला अद्याप थोडा अवकाश होता. बाबांच्या खोलीत गर्दी होती. प्रार्थनेपूर्वी कांही लोकांनी वाद्यांच्या साथीसह रवींद्रनाथांचे भजन म्हटले. श्री. जगदीशदासगुप्त या वृद्ध गृहस्थानें मीराबाईचे भजन गायिलें. त्या भक्तियुक्त सुरांच्या वातावरणानें खोली भरून गेली होती.

---

# निर्भयता प्रेम हीच इस्लामी राष्ट्राची भूमिका : १० :

[दिवस दहावा, रंगपूर ते पगलापीर अंतर ७ मैल]

नित्याप्रमाणे साडेतीन वाजता पदयात्रा सुरू झाली. रंगपूर जिल्ह्याचे अधिकारी सोबत होते. त्यांनी वाटेत विनोबांना प्रणाम करून त्यांचा आशीर्वाद मागितला आणि ते गेले. जेलखाना या रस्त्यावरच होता. जेलचा एक अधिकारी आपल्या मुलाला घेऊन बाबांच्या बरोबर बोलत बरीच वाट चालून गेला

पगलापीरला जाण्याच्या वाटेवरच कविराज यशोदाबाबूंच्या बरोबर बाबांची चर्चा झाली. त्यांनी विचारले–भारत सरकारने संततिनियमनाची योजना केली आहे, पाकिस्ताननेंहि तशीच केली आहे. परंतु अशा तऱ्हेची योजना न करता प्राचीन भारतीय ऋषींनी जी ब्रह्मचर्यादि चार आश्रमाची व्यवस्था केली होती तशी केली असती तर बरे झालें नसते का? त्यामुळें संतति नियमन झाले असते आणि देशात चांगले पुरुष जन्माला आले असते

विनोबा—खचित बरे झाले असते. पुरुष ५० वर्षांचा झाला आणि स्त्री ४०-४५ वर्षांची झाली म्हणजे त्यांनीं पतीपत्नीप्रमाणे राहू नये, भावाबहिणीप्रमाणे रहावे.

यशोदाबाबूंनी आणखी एक प्रश्न विचारला 'भारत आता स्वतंत्र झाला रामाच्या सभेंत वसिष्ठासारखे ज्ञानी त्याचे मंत्री होते. जनक राजाच्या सभेंत याज्ञवल्क्य ऋषि होते युधिष्ठिराच्या सभेंत वेदव्यास होते. विक्रमादित्याच्या सभेंत कालिदास वगैरे नवरत्नें होती विजापूरचे राजे हरिहर यांच्या सभेंत माधवाचार्य–पुढें जे विद्यारण्यस्वामी झाले ते–होते आता स्वतंत्र भारतात अशा प्रकारची पंडितसभा संघटित करून त्यांचा परामर्श घेऊन राज्य चालविण्याची योजना आखली असती तर बरें झाले नसतें का?

विनोबा—त्यावेळीं राजे लोक राज्यशासन करीत. राजप्रासादांतून या पंडिताचा व मंत्रीमंडळाचा निर्वाह करण्यांत येई. आता

राजशासित देश नाही लोकशाहीचे युग चालले आहे पार्लमेंटच्या द्वारा देशाचे राज्य चालते म्हणून पूर्वीप्रमाण या पडितमडळीच्या द्वारे देशाचे राज्य चालणार नाही

प्रश्न—भारतात विश्वविद्यालयाच्या मार्फत वेद, उपनिषद, गीता, भागवत इत्यादि हिंदुशास्त्रग्रथ सक्तीनें शिकविण्याची व्यवस्था करण्याबद्दल आपले काय मत आहे ?

विनोबा—काही काही विद्यालयात गीता शिकविली जाते उपनिषदेंहि शिकविली जातात परतु सक्तीनें एखाद्या विशेष धर्माचे शास्त्र शिकविणे चागले नाही सर्व धर्मांचे शास्त्र शिकविण्याची व्यवस्था करणे योग्य होईल

* * *

सकाळी साडेसहावाजता पगलापीरच्या डाक बगल्यावर पोहोचला प्रवेशद्वारी शाळेच्या बॉय स्काऊटनी स्वागत केले डाकबगल्याजवळच्या मैदानात पुष्कळ लोक उभे होते विनोबाजी त्याना उद्देशून म्हणाले—

"या लहान लहान स्काऊट मुलानी—बालवीरानी स्वागत केल ते मला फार आवडले स्काऊटिंगमुळें मुलात एकता येते प्रेमाचा प्रकाश पडतो हा प्रेमप्रकाश गावोगाव सवत्र पसरला पाहिजे पाकिस्तानात आल्यापासून तुमचे प्रेम मिळाल्यानें मला फार आनन्द झाला येथें येऊन तुमचे अन्नपाणी, फळें, भाजी मी खात आह म्हणून मला वाटले मीहि परत तुमची काही सेवा केली पाहिज त्यासाठी मी गरीबासाठी भूमिदान मागत आहें ह गाव लहान आहे लहान गावात हृदय मोठें असत शहरात शिकलेले मोठे लोक राहतात परतु त्याच हृदय सकुचित असतें मी येथें आल्यापासून रोज मला दान मिळत आहे प्रत्येक भूमिवतानें कांही ना काही, थाडे तरी दान द्याव अशी माझी इच्छा आहे तुम्ही आमच्या सावत्याना घेऊन घरोघर जा आणि गावातील गरिबासाठी भूमिदान मागून आणा" यानतर 'आमच्या गावी कोणी भूमिहीन राहणार नाहीं, राहणार नाहीं' हा अर्थाच गाण त्यानी मुलाकडून म्हणवून घेतले आणि म्हणाले "कमी असो आस्त असो कांहीं तरी दान मागून आणाव ह काम तुम्ही

करू शकला तर या तुमच्या गावाचा गौरव वाढेल आणि हें गाव सर्वांचे पुढारी होईल."

* * *

सकाळच्या भाषणानंतर बराच पाऊस पडला. आम्ही पोहोचल्यानंतर थोड्याच वेळांत S. D. O. साहेब तेथें येऊन पोहोचले. बरोबर त्यांनी आपल्या बारा-तेरा वर्षाच्या मुलास आणले होतें. हा लहानपणापासून कराचींतच होता म्हणून मातृभाषा बंगाली असली तरी त्याला बंगाली बोलावयास येत नव्हतें, उर्दूच बोलू शकत होता. S. D. O. साहेब म्हणाले साधू कोणाला म्हणतात असें हा मुलगा मला विचारीत होता. शक्य तितका त्याचा अर्थ मी समजून दिला आणि साधूच्या दर्शनासाठी मी त्याला घेऊन आलो. मुलाला त्यांनी विनोबांच्या जवळ बसविलें.

* * *

सुमारे दहा वाजता बाबा गावात फिरावयास निघाले. त्या मुलाचा हात धरून ते बाहेर पडले. महादेवीताई आणि मी बरोबर होतो. गावात थोडेसे पुढें गेल्यावर बरेच लोक त्यांच्या बरोबर चालू लागले. विनोबांनी त्यांना विचारलें, कोणी मला आपल्या घरात घेऊन जाईल का? कोणी जमीन देईल का? एका पुढारलेल्या मुसलमान गृहस्थाच्या घरी त्यांना नेण्यात आले. पण घराचा मालक सापडेना. थोडी चौकशी केल्यावर तो एकदाचा सापडला. बाबानी त्याला विचारले,'काही जमीन द्याल की नाहीं?' गृहस्थ म्हणाला माझ्या जवळ जमीन फार नाहीं तेव्हा तुम्हाला कशी द्यायची ? महादेवीताई घरात शिरून बायकाच्या बरोबर बोलत फिरत होत्या. याप्रमाणे अर्धातास काही घरी जाऊन बाबा परत फिरले आणि म्हणाले, 'या पगलपीर गांवात पूर्वी एखादा पागल असावा. आता मी दुसरा पागल आलो आहे. आपल्यासारखा आणखी कोणी पागल भेटतो का तें पाहत होतों. पण कोणी पागल भेटला नाहीं. सारेच बुद्धिमान् आहेत.'

रंगपूरच्या S. D. O. साहेबानीं या यात्रेंत एक 'ट्रॅन्झिस्टर' देण्याची व्यवस्था केली होती. सरकारी वायरलेस सेट ज्याच्या ताब्यात होता

याच्याकडेच त्यांनी हे काम दिलें होते. हे गृहस्थ रोज सकाळी ट्रँझिस्टर आणून देत व सध्याकाळी परत नेत. ही जबाबदारी ते गृहस्थ अगदी नेष्ठापूर्वक पार पाडीत असत. त्यामुळें बाबाना आणि इतर यात्रेकरूना रोजच्या बातम्या ऐकण्याची चागली सोय झाली

सध्याकाळी रगपूरहून आमचे नवे साहित्यिक मित्र श्री. कयासुल हक श्री केशव पटेल यांच्यासह कित्येक वर्तमानपत्रकर्ते, शिक्षण-तज्ञ, साहित्यिक आणि रगपूर कॉलेजचे अध्यापक जनाब अबूहना महमद महसीद इत्यादि लोक तेथें आले आणि त्यांनी बाबाशी अनेक विषयावर चर्चा केली. त्यांच्या पैकी अनेकानी विनोबाची भाषणे ऐकली होती आणि प्रत्यक्ष बाबाना भेटण्याची त्यांची इच्छा होती म्हणून ते दहाबाराजण मिळून आले होते. सर्वजण तरुण होते. त्यांच्याशी चर्चा झाली ती अशीः—

प्रश्नः—आपण येथल्या बेसिक डमॉक्रसीची प्रशसा केली आहे. तेव्हा तशी च भारतात चालू झाल्यास तुम्ही ती मान्य कराल का ?

उत्तरः—आपल्याला जशी वाटते तशी मीं प्रशसा केलेली नाही. एक चागला प्रारभ आहे एवढेंच मी म्हटले होते. युनिअन कौन्सिले जर प्रेम आणि करुणेच्या पायावर गावाची सुधारणा करण्याची कामें करतील तर यथार्थ डेमॉक्रसी निर्माण करण्यास सहाय्यक होतील. आपण पहाताच की देशावर सकट उपस्थित झाले की Democracy does not believe in itself डेमॉक्रसीचा स्वतःवर विश्वास असत नाही. याचे मुख्य कारण हें आहे की, देशाची शासनशक्ति म्हणजे सरकार, सैन्य-शक्तीवर अवलबून असते. जोपर्यंत डेमॉक्रसी अहिंसेच्या पायावर उभारली जाणार नाही तोपर्यंत खरी डेमॉक्रसी येणार नाही. म्हणून मी जेव्हां बेसिक डेमाक्रसी विषयी बोललो तेव्हां त्याचा अर्थ इतका च की काहीं सालच्या थरापर्यंत आतां बरें काम होऊ शकेल एवढें च.

प्रश्नः—बेसिक डेमॉक्रसी मनुष्याला यथार्थ स्वतत्रता देऊ शकेल काय ?

उत्तरः—जोपर्यंत बेसिक डेमॉक्रसी हिंसेवर अवलबून राहील तोपर्यंत मुक्ति म्हणजे emancipation होणार नाहीं. हल्लीं जगाची

परिस्थिति फार विचित्र आहे जगातील मोठमोठ्या राष्ट्रांच्या नेत्यांचा आता हिंसेवरचा विश्वास नाहीसा झाला आहे परतु अहिंसेवर मात्र त्यांचा विश्वास अद्याप बसलेला नाही त्यांची मानसिक स्थिति अशा मधल्या अवस्थेत आहे अशा वेळी मला साहित्यिक हेच एक आशास्थान वाटतात शिक्षणामध्ये जी समाजपरिवर्तनाची शक्ति अतर्भूत आहे त्यावर तुम्हा अध्यापकांचा हि आजकाल विश्वास नाही

प्रश्न —कम्युनिस्टाचा असा दावा आहे की, त्यांच्या मार्गानें च विश्वशातीची स्थापना होईल याविषयी तुमचे काय मत आहे ?

उत्तर —कम्युनिझम्‌ची मुख्य शक्ति करुणा आहे जरी कम्युनिझम्‌ हिंसेचा उपयोग करतो तरी हि तो दु खितांचे दु ख निवारण करण्याचा प्रयत्न करतो ही दु ख निवारण्याची तीव्र भावना आपल्यामध्ये हि पाहिजे, आणि क्रांति आणि अहिंसा यांचा समन्वय करणे हे आपले ध्येय असले पाहिजे साधारणत असे दिसून येते की, ज्यांचा अहिंसेवर विश्वास असतो ते लोक Status Quo वाले असतात म्हणजे समाज-व्यवस्था आहे तशीच असावी असे मानणारे असतात आणि ज्याना क्रांति पाहिजे असते ते हिंसावादी असतात Marxian dialectic च्या भाषेत बोलायचे झाले तर Non Violence Status Quo म्हणजे Thesis, Violence & revolution म्हणजे Anti-thesis आणि Non Violence & revolution म्हणजे Synthesis होय

प्रश्न —ही अहिंसक क्रांति घडवून आणायची असल तर काय केले पाहिजे हे थोडें विशद करून सांगा

उत्तर.—त्याकरता प्रथम Decentralisation of Power म्हणजे सत्तेचे विकेंद्रीकरण केले पाहिजे सगळ्यात जास्त सत्ता अगदी खालच्या थरात असली पाहिजे. वरच्या थरांत त्यापेक्षा कमी सत्ता आणि सर्वांत वरच्या थरात केवळ Moral Power म्हणजे नैतिक शक्ति असली पाहिजे.

दुसरी गोष्ट, सहयोगी समाजाची म्हणजे Co operative Society ची सघटना स्थापना केली पाहिजे

तिसरी गोष्ट, प्रत्येक व्यक्तीचा सर्वांगीण विकास करण्याला पूर्ण संधि असली पाहिजे.

चौथी गोष्ट, समाजकल्याणासाठी समर्पण-वुद्धि असली पाहिजे.

पाचवी गोष्ट, शिक्षणक्षेत्रात ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय असला पाहिजे.

हल्ली जे लोक काम करतात त्यांना ज्ञान असत नाही आणि ज्यांना ज्ञान असतें ते लोक काम करीत नाहीत. अशा प्रकारें श्रमजीवी आणि वुद्धिजीवी असे दोन भाग समाजात पडले आहेत. माझें "सर्वोदय-विचार आणि स्वराज्यशास्त्र" या नावाचें एक पुस्तक आहे त्यात या विषयाची चर्चा केलेली आहे अहिंसक समाज-रचनेचा पाया ग्रामदान असेल अर्थात् सगळ्या गावाचें एक कुटुंब होईल. भूदान हे त्यासाठी अनुकूल वातावरण निर्माण करण्याचें काम करीत आहे

अखेरीस विनोबा म्हणाले जगात सत्त्व, रज आणि तम या तीन शक्ति आहेत यांपैकी एखादी निरुपयोगी आहे असे मी मानीत नाही रज आणि तम या गुणावर सत्त्वगुणाचा कंट्रोल असला पाहिजे. म्हणजे सत्त्वगुणाच्या निर्देशाप्रमाणे ते गुण चालले पाहिजेत या तीनी गुणांची गरज आहे तमोगुण नसेल तर रात्री झोप येणार नाही, रजोगुण नसेल तर दिवसा हातून कर्म होणार नाही, आणि सत्त्वगुण नसेल तर वुद्धि राहणार नाही. सत्त्वगुण हे आगगाडीच्या रुळाप्रमाणे आहेत, रजोगुण हे इंजिन आहे आणि तमोगुण हे गाडीचे डबे आहेत.

लोक मला विचारतात तुमच्या आदर्श समाजरचनेंत तुम्ही रज आणि तम यांना दूरच राखू इच्छिता काय? मी त्यांना सांगतो या गुणांना सत्व गुणाच्या आधीन म्हणजे कंट्रोलमध्यें मी ठेवू इच्छितो. कारण रज आणि तम यांना वुद्धि असत नाहीं. हल्लीच्या यांळी दुनिया ज्या भयानक परिस्थितीत सापडली आहे त्यावरून मला वाटतें कीं, दिवा विझण्यापूर्वी जसा तो मोठा होतो तशी आताची अवस्था आहे.

* * *

सध्याकाळची प्रार्थना-सभा फार मोठी होती. बरोबर पावणेपाच वाजता सभेला सुरुवात झाली विनोबांनी सांगितलें–

## भयाचें कारण देहबुद्धि

"आज आमच्या यात्रेचा दहावा दिवस. आपणा सर्वांच्या दर्शनामुळें आणि तुमचा उत्साह आणि प्रेम पाहून मला फार आनंद होत आहे आणि त्यामुळें मी अगदीं पहिल्या दिवसापासून गरीबासाठीं भूमिदान मागूं लागलों आहे आणि मला तें मिळालें हि आहे. लोकाना प्रेमानें समजावून दिलें म्हणजे त्याना नीट समजतें. काल आमचा मुक्काम मोठ्या शहरात होता त्या ठिकाणीं एक भाई मला येऊन म्हणाले, आम्ही निर्भय व्हावें असा आम्हाला आशीर्वाद द्या त्याचें म्हणणें मला फार आवडलें. निर्भयता हा एक महान् गुण आहे. तो कसा मिळवावयाचा ? जे लोक देहाच्या आधारावर च राहतात, हा देह म्हणजे च केवळ आपण असे समजतात, ते कधीं हि निर्भय होऊं शकणार नाहीत परंतु हा देह म्हणजे मी नव्हे. मी आत्मा आहें सर्व देहामध्यें मी च राहतो. असें जेव्हा त्याना वाटूं लागेल, तेव्हाच ते निर्भय होतील अशा व्यक्तीना कोणापासून कोठें हि भय असत नाही. त्याच्यापासून हि कोणाला भय वाटत नाही स्वतंत्र माणसाचें लक्षणच असें असतें की, तो कोणाच्या अधीन असत नाही, किंवा दुसऱ्या कोणाला आपल्या अधीन राखीत नाही साधारणत लोकाना असें वाटतें कीं जो कोणाला भीत नाहीं तो च निर्भय आणि जो कोणाची गुलामगिरी पत्करीत नाहीं तो स्वतंत्र परंतु माझें म्हणणें असें आहे की, हे गुण तर हवेत च, पण जो दुसऱ्याना भय दाखवतो तो निर्भय नव्हे आणि जो दुसऱ्याला स्वाधीन राखतो तो स्वतंत्र नव्हे

मांजर उंदराला पाहून भीत नाही परंतु कुत्र्याला पाहिल्यावर तेच मांजर भयानें पळून जातें. तेव्हा आता या मांजराला निर्भय म्हणायचें की भित्रें म्हणायचें ? कुत्रें, हरिण वगैरे सर्व प्राण्याना वाघाचें भय वाटतें म्हणून वाघाला सर्वजण वीर, पराक्रमी म्हणतात पण त्याला बंदुकीचें भय वाटतें. कुत्र्याच्या पुढें वाघ वीर असतो याचें कारण आपली नखें, दात आणि पायाची शक्ति हीं कुत्र्यापेक्षा जास्त आहेत हें त्याला माहीत असतें. पण तो च वाघ मनुष्याची बंदूक पहिल्यावर पळून जातो. म्हणून वाघाला हि भित्राच म्हटलें पाहिजे. तो जेव्हा साहस दाखवून आक्रमण

करतो तेव्हा आपल्या देहशक्तीचा हिशोब करून च आक्रमण करतो आणि त्याला जेव्हा देहानें अधिक बलवान् प्राणी भेटतो तेव्हा तो पळून जातो, तेव्हा हि देहशक्तीचा हिशोब करुन च पळून जातो. गेल्या जागतिक युद्धात जर्मन लोकानी जेव्हा बेल्जमसारख्या लहान लहान देशावर आक्रमण करून ते जिंकले तेव्हा जर्मन लाक म्हणजे खूप पराक्रमी, साहसी असे म्हटले गेले. परतु जेव्हा अमेरिका युद्धात पडली तेव्हा जर्मनीनें आपला पराभव मान्य केला. हे जे युद्धात जय आणि पराजय होतात ते केवळ देह-शक्तीच्या हिशोबानें च होतात त्यामुळें तिथें वीरत्वाचा किंवा साहसाचा प्रश्न नाही. परतु एखादा लहान मुलगा हि जेव्हा आत्म-शक्तीनें अधिक प्रबळ शक्तीला तोंड देतो तेव्हा त्या कृतीला निर्भय म्हणता येईल. आपण केवळ एका च शरीरात बाधलेलो नसून सगळ्या देहात आपण आहोत, हें जेव्हा आपल्या नीट लक्षात येईल, अशी बुद्धि जेव्हा आपणाला होईल त्यावेळी आपल्यात खरी निर्भयता आणि खरे प्रेम येईल जेव्हा हृदयात प्रेमज्योतीचा प्रकाश पडेल तेव्हा जगातील सर्व लोक च आपण आहोत, कोणी आपला शत्रू नाही सर्व मित्र च आहेत असे आपल्याला वाटू लागेल

## ईस्लामी राष्ट्रांनीं भूदानाचे कार्य हातीं घेतलेंच पाहिजे

आज काही लोकानी प्रश्न विचारला आहे की, 'भूदान हा पूर्ण प्रोग्राम आहे की एक साधनमार्ग आहे?' मी त्याना उत्तर दिले, जगामध्यें प्रेमाचा विस्तार करण हा माझा मुख्य उद्देश आहे. सगळ्या देशातील सगळे लाक भाऊ भाऊ आहेत, त्याच्यामध्यें कसले हि वेगळेपण किंवा भेद नाही. प्रत्येक गाव म्हणजे एक कुटुंब ही च योजना भूदानात आहे गावात जे गरीब, भूमिहीन आहेत त्याना जमीन देऊन त्याचें दारिद्र्य दूर केले पाहिजे. कोणी विचारतील की केवळ भूमिदानानें दारीद्र्य नाहींसें होईल काय? त्याला उत्तर असें की या भूदानाशिवाय आणखी हि काही गोष्टीची आवश्यकता आहे परतु दुसऱ्या सर्व गोष्टी असून भूदान मात्र नसेल तर गावाचे दारिद्र्य दूर होणार नाही. गावामध्यें एक-कुटुंबभावना आणि प्रेम-सपर्क वाढणार नाही. हा कार्यक्रम पाकिस्तान आग्रहपूर्वक स्वीकारील असा मला विश्वास वाटतो, कारण इस्लाम म्हणजे

च मुळी शांति शांतीची कामना करून च मुसलमान लोक एकमेकांना अभिवादन करीत असतात 'धर्माच्या विषयात केव्हा हि जबरदस्ती चालणार नाही,' असं इस्लामचे एक वचन आहे सगळ्याशी प्रेमाचा व्यवहार करणे, नम्रतापूर्वक, प्रेमपूर्वक, आपला विचार समजावून देणे आणि दुसऱ्याचा विचार समजून घेणे, याचे च नाव तर इस्लाम ! या ठिकाणी ईस्लामच्या नावानें एक राष्ट्र स्थापित झाले आहे तेव्हां या ठिकाणी राष्ट्रध्येय म्हणून भूदानाचे काम मान्य केलें पाहिजे

आपण केवळ स्वतःची चिंता न करता समाजाची चिंता केली, त्याची सेवा केली तर समाज हि आमची आणि आमच्या मुलांची काळजी घेईल गावच्या सर्व मुलामुलींची जबाबदारी गाव घेईल, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करील गावचे लोक जर एकपरिवार होतील तर सर्वांची च उन्नति होईल अशा प्रकारे जी समाजरचना होईल त्यालाच 'सर्वोदय-समाज' म्हणतात भूदान हा त्याचा केवळ प्रारंभ आहे सगळ्यांचा जय हाच भूदानाचा उद्देश आहे साधारणत एकाचा जय झाला म्हणजे दुसऱ्याचा पराजय होतो एकाच्या पराजयानें दुसऱ्याचा जय होतो अशा स्थितीत खरोखर पाहिले असता जय कोणाचा च होत नाही जेव्हा उभयपक्षीं जय होतो तेव्हा च तो खरा विजय सगळ्यांची उन्नति होईल तेव्हा च ती उन्नति. म्हणून मी 'जयजगत्' असें म्हणतो. एका बाजूला जयजगत् आणि दुसऱ्या बाजूला ग्रामदान–ग्रामपरिवार

* * *

मौनप्रार्थनेनंतर आजच्या दानाची घोषणा करण्यात आली. आज ह्या ल्हान गावात पाच भूदानें मिळालीं एक तरुण वेगवेगळ्या ठिकाणाहून फोटो घेत होता ता आपला परिचय करून देत म्हणाला, "मी सिनेमात काम करतो स्वत फिल्मॲक्टर हि आहें. विनोबांना भेटण्यासाठी डाक्कयाहून आलों आहें. मी त्याना भेटू इच्छितो'–मी त्याला विनोबाजींजवळ घेऊन गेलो आणि म्हणालो आपल्याला वकील शिक्षक, विद्यार्थी, मजूर, शेतकरी असे नाना प्रकारचे लोक भेटतात, पण आज नव्या धंद्यातला एक माणूस—फिल्मॲक्टर आपल्याला भेटावयास

आला आहे विनोबांनी त्याचा हात धरून प्रेमपूर्वक त्याला जवळ बसवून घेतले. तेव्हा तो तरुण इग्रजीत म्हणाला– डाक्क्यातील वर्तमानपत्रांत तुमच्या पदयात्रेचे वृत्त ऐकून आपल्याला भेटण्याची इच्छा झाली. मी दिनाजपूर जिल्ह्यातला राहणारा आहे. आपली यात्रा दिनाजपूर जिल्ह्यातून जाणार आहे. तेव्हा या यात्रेबद्दल श्रद्धा वाटून आणि या पदयात्रेची स्मृति म्हणून मी तीन एकर जमीन भूदानात देऊ इच्छितो.

बाबा खूप झाले आणि त्यांनी त्या तरुणाला प्रेमपूर्वक निरोप दिला. त्याने दानपत्र लिहून दिले आणि काही फोटो काढून तो निघून गेला.

कोणाच्या हृदयात केव्हा प्रकाश पडेल ते सागता येत नाही. या तरुणाच्या दानापेक्षा त्याच्या सद्भावनेचे अधिक मूल्य आहे. जगांत सद्भावनेची च उणीव आहे



[दिवस अकरावा, १६ सप्टेंबर, पगलापीर ते तारागज अंतर ९ मैल]

नित्याप्रमाणे पहाटे तीन वाजता यात्रा सुरू झाली. आज यमुनेश्वरी नावाची नदी नावेतून पार करावयाची होती. नदीच्या दोन्ही तीरावरील उत्तम पक्क्या सडका जोडणारा नदीवरचा पक्का पूल हि बांधून तयार झाला होता, परंतु अजून तो रहदारीसाठी खुला नव्हता. त्याचा उद्घाटन-समारंभ व्हायचा होता. आज तो पूल विनोबाजी व पदयात्रींना जाण्यासाठी तात्पुरता खुला केला होता. मंडळींनी त्यावरून नदी पार केली.

वाटेत ब्राह्मणवाडीच्या एका गृहस्थानें मांसाहार केल्यास ब्रह्मचर्य-पालन करणे शक्य होईल का? असा विनोबांना प्रश्न केला. बाबा म्हणाले—

"आहाराच्या कांहीं श्रेणी आहेत. कंदमूळफळांचा आहार च सर्वोत्तम आहार आहे. त्याला शिजविण्याची जरूरी नसते. दुसरी श्रेणी म्हणजे तांदूळ डाळ, गहूं इ० धान्यें व भाज्या. हे शिजवून खाण्यात येणारें निरामिष अन्न. तीसरी श्रेणी म्हणजे धान्य भाज्या दूध आणि दुधाचे पदार्थ. दूध तिसऱ्या श्रेणींत घालण्याचें कारण ते प्राणिजन्य आहे. तरी त्याला निरामिष म्हणता येईल. चौथी श्रेणी म्हणजे मासे, मांस, धान्य भाज्या वगैरे. अर्थात् साधारणतः याला मांसाहार म्हणतात.

खाण्याच्या पदार्थांच्या या चार श्रेणी, त्यांच्या श्रेष्ठत्वाचा विचार करून च ठरविल्या आहेत. मनुष्याचे स्वास्थ आणि ब्रह्मचर्यपालन यासाठीं कमीजास्त प्रमाणात कोणता आहार सहाय्यक होईल ही गोष्ट ब्रह्मचर्य-पालन करणाराच्या मानसिक अवस्थेवर अवलंबून आहे. मनाच्या अवस्थेचा विचार करून, कोणता आहार कितपत सहाय्यक आहे याचा विचार करून, तें ठरविलें पाहिजे. आहारात जर आसक्ति म्हणजे विशिष्ट वस्तूची आवड किंवा पाशेल पण असेल तर सामिष किंवा निरामिष कोणताहि आहार

ब्रह्मचर्याला सहाय्यक होणार नाही आहारात निर्लिप्तता, अस्वाद असेल तर ब्रह्मचर्य पालन करण्यात आहार ही वस्तू सहाय्यक होईल"

मार्गांत एक भजनीमडळ यात्रेंत येऊन मिळाले लहानलहान मुलाना भगवी वस्त्रें घालून आणि कपाळावर चदनाचा टिळक करून त्याना बाल संन्याशाच्या रूपात सजविले होते ती मुले टाळचा वाजवीत नाचत नाचत हरिनामाचा घोष करीत होती बाबाच्या पुढें येऊन त्यानी बाबाची आरती केली गळयात हार घातला आणि प्रणाम करून भजन करीत ती मुले मागून चालू लागली थोडें पुढें गेल्यावर आणखी एक भजनीमडळ यात्रेला येऊन मिळाले सुमारे सहाच्या सुमारास बाबा थाबले आणि भजनी मडळीकडे तोड करून उभे राहिले मुले टाळचा वाजवीत, नाचत 'रामकृष्णहरि' असे भजन करीत होती बाबा हि टाळचा वाजवीत त्याच्या भजनात सामील झाले त्यावेळी त्याच्या डोळयातून भक्ति-प्रेमाने अश्रू वाहू लागले होते थोडचा वेळानें मुलाना त्यानी शात व्हावयास सांगितले आणि म्हणाले, तुमच्या भजनानें मला फार आनन्द झाला आहे

आज वाटेंत मागेंपुढें मिळून हजार दीड हजार लोक चालले होते. यापूर्वी एवढी मोठी गर्दी यात्रेबरोबर कधी झाली नव्हती सुमारे साडे-सात वाजता मुक्कामाच्या जागी पोहोचला शाळेच्या मैदानात जमलेल्याना उद्देशून बाबा म्हणाले--

## सेवाकर्मांत प्रेमाचा प्रकाश

"आपल्याला पाहून मला फार आनन्द झाला गेले दहा दिवस तुमच्या-मध्यें उत्साह आणि प्रेम दिसत आहे परतु हा उत्साह आणि हें प्रेम कांही कामाला लागले पाहिजे प्रेम आणि उत्साह जेव्हां कर्माच्या द्वारां प्रकट होतो तेव्हां च ते खरं प्रेम आणि खरा उत्साह ठरतो वाफ हवेत उडून गेली तर ती कांहीं कामाला येत नाहीं परतु ती च वाफ बॉयलरमध्यें धरून एकत्र साठविली म्हणजे गाडी चालविण्याइतकी तिच्यात प्रबल शक्ति उत्पन्न होते त्याप्रमाणे च तुमच्या प्रेमाचा आवेग मला सेवाकर्मांत पाहण्याची इच्छा आहे गांवामध्यें जे भूमिहीन आणि गरीब लोक आहेत त्यांना जमीन दिली, त्यांचे दुःख दूर केलें तर परस्परांत प्रेमाचा सबध

जडेल, क्रमाक्रमानें सर्व गावाचे एक कुटुंब बनेल, गावात शक्ति उत्पन्न होईल, आनंद वाढेल.

तुमच्या जवळ जमीन थोडी असेल तर थोडी द्या. उरलेल्या जमीनीत पुरेसे खत घालाल आणि भरपूर परिश्रम कराल तर पूर्वीइतके च पीक येईल. युनियन कौन्सिलच्या सभासदांनी आणि अध्यक्षांनी हें काम हातीं घेतलें तर फार चांगलें होणार आहे. जे लोक जमीन दानात देतील त्यांचे खरोखर कांही च नुकसान होणार नाही. ते व घेणारे सुखी होतील आणि जे जमीन देण्याचा प्रचार करतील ते पण सुखी होतील. याप्रमाणे सुखाचा एक परिवार निर्माण होईल."

*        *        *

तारागज येथें ज्यांनी विनोबाजींच्या आणि पदयात्री लोकांच्या व्यवस्थेची जबाबदारी घेतली होती त्यांचा उल्लेख करणे जरूर आहे. विनोबाजींच्या पदयात्रेचा कार्यक्रम आणि मुक्कामाची जागा ठरविण्यासाठीं दोघा सरकारी अधिकाऱ्यांबरोबर प्रथम जेव्हां मी इथें आलो तेव्हां जीप-मधून उतरता च या गृहस्थाची भेट झाली. त्यांचे नांव जनाब अमीनुद्दीन सरकार. गावच्या अनेक उन्नतीच्या कामात त्यांचा संबंध आहे. प्राथमिक शाळा त्यांच्या च देखरेखीखालीं चालत होती. त्यांना विनोबांच्या पद-यात्रेची हकीकत सांगितली आणि येथें मुक्कामाचें ठिकाण ठरवायचें आहे असे मी म्हणालो. माझें म्हणणें ऐकून लगेच ते म्हणाले, 'विनोबांविषयी मी पूर्वी च ऐकलें आहे त्यांची पुस्तकें हि मी पाहिलीं आहेत. गरीबांसाठीं ते जमीन मागत आहेत एक महान् पुरुष आमच्या गांवीं येत आहे हें आमचें महद्भाग्य आहे. तेव्हां विनोबाजींची आणि पदयात्री दलाची राहण्याची आणि खाण्यापिण्याची व्यवस्था मी च पाहतो' शेजारी २-३ हिन्दु गृहस्थहि होते. त्यांच्याकडे बोट करून म्हणाले, 'हे माझे सोबती आहेत. माझ्याबरोबर च काम करतात. यांच्या मदतीनें मी सर्व व्यवस्था करू शकेन.' मराठी बोलण्यातील शेंडेगावांत एका मुसलमान गृहस्थाला विनोबांची माहिती पूर्वीपासून च असावी आणि आम्ही कांहीं बोलण्यापूर्वीं च त्यांनी स्वत: होऊन आग्रहपूर्वक सर्व जबाबदारी उचलावी या घटनेनें मी प्रभावित झालो. बाबांना त्यांची माहिती सांगून त्यांचा परिचय करून दिला.

संध्याकाळी चार वाजता प्रार्थनासभा झाली. सकाळी पाऊस पडल्यामुळें लोक इकडेतिकडे उभे होते. स्वयंसेवक आणि पोलीसलोकांनी लोकांना थोडें दूर च अडवून धरलें होतें. त्या सर्वांना जवळ येण्यास सांगितले. सर्वजण एकदम पुढें येऊं लागल्याने बरीच गडबड झाली. पोलीस आणि स्वयंसेवकांना बसावयास सांगून विनोबा स्वतः च जनतेला सभेसाठी सुव्यवस्थित बसविण्याच्या उद्योगाला लागले. सभेला सुमारे दहा हजार लोक उपस्थित असावेत. लोक शांत झाल्यानंतर भाषणाला सुरुवात झाली.

## दंडशक्ति, अहिंसा आणि स्वयंशासन

"आता पहा तुम्ही कसे शांतपण बसला आहात. याप्रमाणे च जर सर्व क्षेत्रांत दंडशक्ति निरपेक्ष स्वयंशासित होऊं शकाल तर किती चांगले होईल? खरी शांति अहिंसेच्या द्वारा च प्रस्थापित होऊं शकेल. दंडशक्तीच्या द्वारा होणारी शांति खरी शांति नव्हे. समाज जेव्हां स्वतः च नियम आणि नीति-पालन करणार नाहीं तेव्हां दंडशक्तीची जरूरी पडेल.

तुम्हाला प्लासीच्या लढाईची गोष्ट माहीत आहे? त्या लढाईंत इंग्रजांनी बंगाल प्रदेशावर जय मिळविला. आम्ही त्या लढाईंत हरलो कारण क्लाईव्हच्या सैन्यात शिस्त होती आणि आमचे सैन्य संख्येनें पुष्कळ असलें तरी शिस्तीचा अभाव होता. म्हणून आमचा युद्धांत पराभव झाला. नेपोलियननें एकामागून एक देश जिंकले आणि शेवटी इंग्रजांकडून वाटर्लू येथें त्याचा पराभव झाला. आणि शेवटी त्याला सेंट हेलेना बेटांत बंदिवासात टाकण्यांत आलें. त्याठिकाणी त्याला विचारण्यात आलें 'तुमचा लढाईंत कोठें हि पराभव झाला नाहीं पण वाटर्लूच्या लढाईंत तुमचा कां पराभव झाला?' त्याने उत्तर दिले 'माझ्या मदतीला मार्गांत जे आपलें सैन्य घेऊन येत होता, त्याला तेथें पोहोचावयास सात मिनिटें वेळ लागला म्हणून आमचा पराभव झाला.' यावरून शिस्तीची आणि वेळेची किंमत किती आहे ते पहा."

एवढें प्रास्ताविक झाल्यानंतर विनोबांनी भाषणास सुरुवात केली. प्रथम 'मनपानेहा'चा सुरावर पाठ करून विनोबा म्हणाले—'तुम्ही मराठी

गांत बसल्याने मला फार आनंद वाटत आहे. तुम्ही जर समाजात अशी च स्वयंशासनाची नीति ग्रहण कराल तर पोलीसाची गरज उरणार नाही. तेव्हा प्रेमाची सत्ता चालेल. ज्याठिकाणी जितकी पोलीसाची आणि सैन्याची सत्ता अधिक तेथें समाजाची सत्ता तेवढी कमी. ज्याठिकाणी पोलीसापेक्षा शिक्षकाना प्राधान्य जास्त, त्याठिकाणीं खरी स्वाधीनता असते हें लक्षात घेतले पाहिजे

## भूमिदान ही च चोराला शिक्षा

एखादा, घरात दारिद्र्य असल्याने चोरी करतो. त्याला पोलीस धरून नेतो, कोर्टापुढें हजर करतो. न्यायाधीश त्याला तीन वर्षांची शिक्षा करतो. अशाने चोरी करणे कमी होईल का? थोडा विचार कराल तर तुमच्या लक्षात येईल कीं अखेर ती शिक्षा होते कोणाला? तो माणूस आपल्या कुटुंबाचा एकमात्र पोशिंदा असतो मुलाबाळांना खाऊ घालण्यासाठीं तो चोरी करतो. जेलमध्यें त्याला तीन वेळेला खायला मिळते. चार तास विश्रांति मिळते. दर पंधरा दिवसानीं त्याचे वजन घेतले जाते. वजन कमी झाले तर मेडिकल 'डायेट' दिले जातें. आजारी पडला तर दवाखान्याची व्यवस्था सुरूगात. अशा कितो तरी व्यवस्था असतात. पण इकडे त्याच्या बायकामुलांची काय दुर्गति होते तें पहा. कांही प्राप्ति नसल्यामुळें त्यांना उपाशी किंवा अर्धपोटी रहावें लागतें. पुढें मुलें हि लहान-सहान चोऱ्या करू लागतात. तुम्ही सांगा त्या चोराला जी शिक्षा झाली ती शिक्षा वास्तविक झाली कोणाला? मी जर न्यायाधीश असतो आणि कायदे करण्याची जबाबदारी माझ्यावर असती तर त्या चोराला तीन वर्षे सक्त मजुरी देण्याऐवजीं तीन एकर जमीन देण्याची शिक्षा दिली असती. त्याला तीन एकर जमीन देण्याबद्दल हुकूम दिला असता. त्या जमिनीत त्यानें राबून आपल्या मुलाबाळांचें भरणपोषण करावें अशी ताकीद दिली असती. लोक हंसतील. या पागल बाबाची गोष्ट कोण ऐकेल असें म्हणतील. पण मी सांगू इच्छितो कीं पोलिस लोक समाजाला बांधू शकणार नाहींत. शिक्षक, साहित्यिक आणि समाजसेवक च त्याला बांधू शकतील. जेव्हां त्यांचा प्रभाव पडेल तेव्हां स्वयंशासन चालेल. अर्थात् दंडशक्ती ऐवजी प्रेमाची

सत्ता चालेल. असें झाले म्हणजे गावाचे एक कुटुंब बनेल आणि पृथ्वीवर प्रभूचे राज्य स्थापन होईल.

पाकिस्तान सरकारने प्रेमपूर्वक अनुग्रह करून मला या देशात येण्याची परवानगी दिली आहे. कारण त्याना माहीत आहे की हा माणूस आग लावणारा नाही, आग विझविणारा आहे. लोकाचीं हृदयें जोडणे, प्रेमानें युक्त करणें हें च माझें काम आहे. देशामध्यें अशाति नसावी, शाति स्थापन करावी हे च माझें काम आहे, दुसरे काम नाही. परतु जोपर्यंत गावात भुकेले लोक असतील तोपर्यंत शाति आणि स्वयशासन स्थापित होणार नाही. भूदानाच्या द्वारा जेव्हा सगळयाची हृदयें जोडली जातील, गावाचा एक परिवार होईल, तेव्हा च त्याला गाव म्हणता येईल आणि देशाची उन्नति होईल. तेव्हा विज्ञानशक्ति कामाला लागेल आणि उत्पन्न हि वाढेल. माझा भूदानाबद्दल विशेष आग्रह आहे असे नाही भूदान सोडून दुसऱ्या कोणत्या हि मार्गानें गावामध्यें प्रीति आणि शाति स्थापन करता येईल तर तो मार्ग त्यानें जरूर अनुसरावा"

या नतर पाच मिनिटें मौन प्रार्थना झाली मौन प्रार्थनेनतर हि लोकाचे येणे चालू च होते सभेच्या शेवटी तीन दानें मिळाल्याची घोषणा करण्यात आली.

---

# भक्ताचें काम ईश्वरी इच्छेनें होईल :१२:

[दिवस, बारावा १६ सप्टेंबर, तारागंज ते सय्यदपूर अंतर आठ मैल.]

हल्लीं रोज च पहाटे ३॥ वाजता यात्रा सुरू होते. त्यामुळें ऊन प्रखर होण्यापूर्वीं च सकाळच्या थंड वेळेंत पुढच्या मुक्कामाच्या ठिकाणीं पोहोचतों. आजच्या मुक्कामाचें गाव सय्यदपूर. हें पूर्व पाकचें व्यापारी केंद्र व रेल्वेचें मोठें स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारे ६०-६२ हजार आहे. मोठें शहर म्हणजे सारेंच मोठें. तशी व्यवस्था हि मोठ्या प्रमाणात होती. S.D.O. साहेब जातीनें सर्व व्यवस्थेकडे लक्ष देत होते. स्थानिक लोकांनीं यात्री लोकांच्या जेवणाखाणाची व्यवस्था पत्करली होती. बाहेरून येणाऱ्या लोकांसाठीं एखाद्या यात्रेच्या ठिकाणीं बांधतात तशीं हॉटेलें बांधलीं होतीं. डाकबंगल्यासमोर च सभेच्या जागीं पऱ्याचा मांडव घातला होता. परंतु तो उन्हामुळें तापला असल्यामुळें सभेसाठीं त्याचा उपयोग होऊं शकला नाहीं.

सकाळीं दहा वाजता स्थानिक हिंदु-मुसलमान पुढारी विनोबांना भेटायला आले. नाना विषयांवर चर्चा झाली. बहुतेक सर्वांना हिंदी-उर्दू चांगलें समजत असल्यानें बोलणीं हिन्दी-उर्दूंत च झालीं.

एकानें विचारलें आपण सर्व धर्मशास्त्रांचें अध्ययन केलें आहे. तेव्हां कोणता धर्म सगळ्यांत चांगला हें आपण सांगू शकाल काय?

विनोबा—मी सर्व धर्मांचें सार सेवन घेतलें आहे. जी वस्तु ज्या धर्मांत चांगली आहे ती मी ग्रहण केली आहे. मधमाशी ज्याप्रमाणें नाना फुलांतून मध संग्रह करते त्याप्रमाणें सर्व धर्मांतून मी चांगल्या चांगल्या गोष्टी घेतल्या आहेत.

प्रश्न.—आपण सर्व धर्मांतील मध घेतला आहे तेव्हां स्वतंत्र एखादा धर्मसंप्रदाय स्थापन करण्याचा आपला विचार आहे काय?

विनोबा—नाहीं. हल्लीं पुष्कळ लोकांची अशी मनोवृत्ति झालेली असते कीं, "आमचा धर्म आमचा पंथ श्रेष्ठ, आम्ही सर्वांत उत्तम." ही मनोवृत्ति

मला पसंत नाही एखादा धर्म उच्च किंवा दुसरा नीच असे मी मानत नाही मी सर्व धर्मांतून जरूर असलेल्या चांगल्या गोष्टी घेतो याचा अर्थ असा नव्हे की बाकी गोष्टी अर्थहीन आहेत परंतु त्या सर्वांचे मला प्रयोजन नाही

दुसऱ्या एकाने विचारले 'आपण प्रेमाच्या गोष्टी बोलता. तेव्हा काश्मीरसबंधी जो झगडा चालला आहे तो मिटविण्याचा प्रयत्न का करीत नाही ?

विनोबा हसून म्हणाले हा तर पोलीटिकल प्रश्न आहे मी पॉलिटिक्सची चर्चा करण्यासाठी येथें आलो नाही जर पॉलीटिक्सविषयी चर्चा करायची असेल तर ती प्रे आयूबखान याच्याबरोबर च करीन. तुमच्या बरोबर नाही हें ऐकून सर्वजण हसू लागले

## भेद दूर झाल्यावर नास्तिकता राहणार नाही

एकानें प्रश्न विचारला 'मार्क्सिझम आणि कम्युनिझम फार वेगाने पसरत आहे याचा निरोध करण्याचा उपाय काय ?

उत्तर —मार्क्स जर्मन होता परंतु मार्क्सिझमचे आवाहन सर्व देशांना उद्देशून आहे कारण त्याने गरीबाचे दु ख दूर करण्याचे काम पत्करले होते सगळया जगांत दु ख, दुर्दशा आहे म्हणून च मार्क्सिझमने आंतरराष्ट्रीय रूप धारण केले आहे त्याचा ईश्वरावर च विश्वास नाही. ते नास्तिकतेचा प्रचार करतात परंतु सर्व प्रकारचे भेद दूर करण्यावर त्याचा विशेष जोर असतो याचे कारण हें च की जगात जे आस्तिक आहेत ते ईश्वराचे नाव घेऊन च परस्परात लढाया करतात आणि गरिबांना मदत न करतां त्याचे शोषण करतात. कम्युनिझम आणि नास्तिकता दूर करावयाची असेल तर जगात जे आस्तिक लोक आहेत त्यानी परस्परातील तटे आणि भेद दूर केले पाहिजेत, आणि गरीबाचे दु ख दूर करण्याचे काम हातीं घेतले पाहिजे '

धर्म, राजकारण, भूदान इत्यादि नाना विषयावर चर्चा आणि प्रश्नोत्तरें खूप उत्साहाने हसत हसत झाली. या चर्चेच्यानेहीं एक समाज-

सेवक मुस्लिम तरुण बाबांच्या पुढें बसला होता आणि तो च प्रश्न विचारीत होता प्रत्येक प्रश्नाचें उत्तर देताना बाबा त्याच्या पाठीवर थाप मारीत. तो एका युनियन कौन्सिलचा सभासद होता. तो तरुण नंतर एक भूदान घेऊन आला

संध्याकाळीं चार वाजता डाकबंगल्याच्या मैदानात प्रार्थना सभा झाली. ऊन कडक होतें त्यामुळें बाबांनीं आपलें भाषण थोडक्यात आटोपलें.

## भक्ताचें काम ईश्वराच्या इच्छेनें च होईल

"जगामध्यें आज एकामागून एक नवीन समस्या उत्पन्न होत आहेत आणि त्या सुटण्याचा उपाय दिसत नाहीं. मोठमोठे महापुरुष आपआपल्या काळी अनेक कामें करून गेले परंतु समस्या सुटल्या नाहीत म्हणून कोणती हि समस्या सोडविण्याची जबाबदारी मी घेऊ शकेन असा मला अहंकार नाहीं. माझ्या हातून जेवढी सेवा करता येईल तेवढी च मी करीत राहीलों आहें. बाकी सर्व ईश्वराला समर्पण. गेल्या ११ दिवसात मला येथें १५० बिघे जमीन मिळाली आहे रंगपूर जिल्ह्याच्या लोकसंख्येचा हिशोब केला तर शेतीसाठीं दर माणशी १॥ बिघा जमीन आहे. अर्थात् या १५० बिघ्यांतून १०० लोकांची योगक्षेमाची व्यवस्था झाली ही कांहीं अगदीं दुर्लक्ष गोष्ट नाहीं. मला एवढ्यानें हि समाधान आहे. यांठिकाणीं एखादी संस्था स्थापन करण्याची माझी इच्छा नाही. मला देवाचा भक्त होण्याची इच्छा आहे. परमेश्वराच्या भक्तावर माझी श्रद्धा आहे. ईश्वराची इच्छा असेल तर या देशांत एखादा देवाचा भक्त हें काम हातीं घेईल. माझ्या जीवनांत मी जें कांहीं काम केलें, जे कांहीं कष्ट मला पडले त्यांच्यांशी तुलना करता देवानें मला भरपूर फळ दिलें आहे.

कारण मुसलमान या बद्दल उन्हांत गर्दी करून उभे आहेत आपणाला फार कष्ट होत आहेत म्हणून मी अधिक बोलत नाहीं."

यानंतर ५ मिनिटें मौन प्रार्थना झाली प्रार्थनेनंतर मीरा दानपत्रांची घोषणा करण्यात आली त्यानंतर आजची एक दानपत्र मिळालीं एकूण आज सम्मदपुरांत चार दानपत्रें मिळालीं.

सभेनंतर मैदानात सावली आल्यानंतर बाबा तेथें फिरावयास गेले. रंगपूरचे A. D. C. साहेब भेटावयास आले. विनोबांनी त्यांना विचारले— ज्या भारतीय नागरीकांनीं भूमिदान केले आहे त्यांचे दानपत्र रजिष्टर करण्यात काही अडचणी आहेत काय ? A. D. C. साहेब म्हणाले— काही अडचणी येणार नाहीत. कायद्याच्या नियमाप्रमाणे केले म्हणजे सर्व काही ठीक होईल.

सय्यदपूर हे च रंगपूर जिल्ह्याचे शेवटचे मुक्कामाचे ठिकाण होते; म्हणून येथें रंगपूर जिल्ह्याच्या सरकारी ऑफीसरनीं निरोप घेतला. दुपारी दिनाजपूर डिव्हिजनचे S. D. O. साहेब तेथें आले व त्यांनी येथली व्यवस्था पाहून घेतली.

पूर्व पाकिस्तानातील बाबांची पदयात्रा आता संपत आली होती. सहकारी आणि कार्यकर्ते यांच्याशी बाबांची विशेष चर्चा झाली नव्हती म्हणून बाबांनी सांगितले की, उद्यापासून दहा वाजता ते कार्यकर्त्यांच्या बरोबर चर्चा करतील

---

## स्वर्ग-नरक, गरीब-श्रीमंत करून ईश्वर परीक्षा घेतो : १३ :

[ दिवस तेरावा, १७ सप्टेंबर, सय्यदपूर ते आलोकदिहि अंतर ७ मैल. ]

नित्याप्रमाणे पहाटे साडेतीनला यात्रा सुरू झाली. सय्यदपूर डाक-बंगल्यापासून सुमारें दोन मैलावर च रंगपूर आणि दिनाजपूर यांच्यामधील सीमा होती. या सीमेवर रंगपूरचे डेप्युटी कमिशनर, पोलीस अधिकारी निलोफामारीचे S. D. O. साहेब यांनी विनोबाजींना निरोप दिला आणि दिनाजपूरचे डेप्युटी कमिशनर पोलीस अधिकारी आणि त्या डिव्हिजनचे S. D. O. साहेब यांनीं त्यांचे स्वागत केले. सुमारे ६॥ वाजतां

आलोकदिहीच्या हायस्कूलच्या प्रागणात सर्वजण पोहोचलो. या ठिकाणी भाषणाकरिता तयार केलेल्या मचावर दोन माईक आधी च उभे केले होते. स्थान फार सुन्दर तऱ्हेनें सजविले होते. भोवतालचे सृष्टीसौंदर्य सुन्दर होते. पक्क्या सडकेच्या बाजूनें खूप मोठे वृक्ष उभे होते म्हणून त्याच्या छायेंत सर्वांनी बसावे असं सागण्यात आले, जवळ च एक लहानशी नदी वाहत होती विद्यालयाच्या समोर आणि मार्गे खूप मोठी पटागणे होती येथल्या झाडाच्या छायेंत पुष्कळ लोक उभे होते. भाषण सुरू होण्यापूर्वी पावसाचे किरकोळ थेंब पडत होते परतु भाषण सुरू झाल्यावर काही वेळ मोठा पाऊस झाला सुमारे ५०० लोक त्या पावसात हि शातपणे भाषण ऐकीत होते. विनोबा त्याना उद्देशून म्हणाले–

## प्रेमाचा प्रत्यक्ष प्रकाश भूदानांतून पडतो

"प्रेम ही एक अशी वस्तु आहे की, ती प्रत्यक्षपणे दाखविणे कठिण आहे तोडानें सागून किंवा हातानें दाखवून तो प्रकाश दाखविता येणार नाही. परतु तो प्रेमाचा प्रकाश प्रकट झाला नाही तर शाति मात्र मिळत नाही प्रेमाचा प्रकाश प्रकट करण्याचा एक रस्ता मला सापडला आहे. आपल्यामध्यें जें प्रेम असतें ते प्रत्यक्षरूपानें प्रकट झाले पाहिजे. गावात जे कोणी गरीब लोक आहेत त्याना काही थोडें भूदान दिल्यानें ते प्रेम प्रकट होईल. रगपूर जिल्ह्यापेक्षा दिनाजपूर जिल्ह्यात जमीन थोडी अधिक आहे. तेव्हा आपण आपल्या जमीनीचा काही अश गरीबाना द्या. यामुळें गावात प्रेमाच्या पाया घातला जाईल गावातल्या लोकानी एकत्र बसून आपण किती जमीन देऊ शकू हे ठरवावे, चर्चा करावी. जमीन कोणाला द्यावयाची हे दात्यानें च ठरवावे आणि त्याबरोबर च जमीनीचा कब्जा आदात्याला देऊन टाकावा. ज्याला जमीन द्यायची त्याला पहिल्या वर्षी बीं-बियाणे, खतें इत्यादींचे सहाय्य केलें पाहिजे. याप्रमाणे गावात प्रेमाचे सबध वाढले तर गांवाची शक्ति पण वाढेल. मी येथून गेल्यावर हे काम कोण चालवील याची मला चिंता नाहीं. ईश्वराची इच्छा असेल तर कोणी हृदयवान् माणूस हें काम हातीं घेईल."

## स्वर्ग-नरक

दहा वाजण्याच्या पूर्वी पदयात्री आणि कार्यकर्ते याच्याबरोबर बाबाची चर्चा झाली. विनोबाजी म्हणाले, "माझ्या एसेन्स ऑफ कुरान" या पुस्तकासंबंधी भूदानपत्रिकेत अच्युत देशपांडे यांनी एक प्रबंध लिहिला आहे. तो प्रबंध वाचून विश्वरजनभाई यानी त्यात मी स्वर्ग-नरका संबंधीं जो भाग उधृत केला आहे त्यासंबधी प्रश्न विचारला आहे. तो प्रश्न असा– 'या जीवनाच्या बाहेर आमच्या कर्मानुसार खरोखर च स्वर्ग आणि नरक मिळतात का, की समाजात नीतीची प्रतिष्ठा रहावी म्हणून स्वर्ग आणि नरक हें काल्पनिक प्रलोभन किंवा भय मात्र आहे ? अथवा या जीवनात च स्वर्ग नरक भोगावा लागतो–आणि याखेरीजच्या जीवनाच्या केवळ कल्पना आहेत ?

—या लोकी अर्थात् या जीवनात हि स्वर्ग आणि नरक आहेत याविषयी संशय नाही. जे लोक धर्मानें चालतात त्याना कित्येक वेळां या जीवनात सुख मिळत नाही आणि जे लोक अधर्माने वागतात अनेक अन्याय्य कामें करतात तरी हि त्याना पुष्कळ भौतिक सुख मिळते असे दिसून येते. कोणी म्हणतात पापपुण्याचे फळ ताबडतोब मिळाले नाही तर या जीवनात च पुढें मिळते. कोणाचे म्हणणे असे आहे की, या जीवनात मिळाले नाही तरी परलोकात मिळते च येशूख्रिस्त धर्माने चालत होता तरी त्याला क्रूसावर चढविण्यात आले परंतु नंतर अनेक वर्षे झाली तरी कोटयावधी लोकाच्या हृदयात तो वास करीत आहे

कर्माचे फळ अनिवार्य आहे हे दाखविण्यासाठी मृत्यूनंतर स्वर्ग-नरकाच्या कथा हिन्दु बौद्ध जैन ख्रिस्ती आणि मुसलमान वगैरे सर्व धर्मांत आहेत. वेगवेगळ्या धर्मांत स्वर्ग नरकाची जी वर्णनें आहेत ती सर्वच मी पाहिलेली नाहीत. हिन्दु जैन बौद्ध वैदिक वैष्णव शैव आस्तिक आणि नास्तिक इत्यादि सर्व लोक पुनर्जन्म मानतात. या जन्मी जें काही आपण काम करतो ते जर अपूर्ण राहिले तर ते पूर्ण करण्यासाठी परत जन्म घ्यावा लागतो. या प्रमाणे कृतकार्यता लाभते अर्थात् कर्म पूर्ण होते तेव्हा मुक्ति मिळते.

या जीवनात आपण पाहतो की, आपण रात्री झोपतो सकाळी उठतो. रात्रीच्या वेळी सर्व वृत्ति अंतर्मुख होतात. दिवसा बहिर्मुख असतात. दिवसा आपण जितके श्रम करतो, प्राय रात्री तितकी विश्रांति घेतो आणि दुसऱ्या दिवशी नवीन उत्साहानें कामाला लागतो. निद्रा म्हणजे मृत्यूचा पूर्व प्रयोग–रीहर्सल–आहे तो प्रयोग आपण रोज करीत असतो. माझा असा अनुभव आहे की, झोंपेच्या पूर्वी जा तीव्र भावना असते ती जागें झाल्यावर हि तशी च असल्याचे आढळून येते. म्हणून च सागण्यात येते की, निजण्याचे वेळी ईश्वराचे स्मरण करून झोपावे म्हणजे ईश्वराच्या स्मरणात च जाग येईल. गीतेमध्यें सांगितले आहे की, मरणाच्या वेळी जी भावना असते ती च भावना परलोकी हि राहते. मानसशास्त्रज्ञ म्हणतात की, मनोभूमीत एखादा विचार ठेवून आपण जर झोपलो तर ती झोप त्या विचार-बीजाला जणू मातीखाली झाकून टाकल्यासारखी असते. झोप संपल्यावर त्या भावनेचा जणू अंकुर बाहेर पडतो. झोंपेत चित्ताला पूर्ण विश्रांति मिळते तरी हि विचारबीजाचा विकास होत असतो. झोपेला जर अडथळा झाला, तीत व्यग्रता उत्पन्न झाली, स्वप्नें पडली तर विश्रांति हि मिळत नाही आणि विचारबीजाला अंकुर हि फुटत नाही. या दृष्टीनें सुस्वप्न आणि दुःस्वप्न, चांगली वाईट दोन्ही स्वप्नें विघ्नकारी आहेत. चांगल्या स्वप्नानें आनंद वाटतो आणि वाईट स्वप्नानें वाईट वाटून विश्रांति कमी मिळते वाईट स्वप्नानें आपण भयभीत होतो. गुरुदेव रवींद्रनाथ यांनी 'दुःस्वप्ने आतके रक्षा करो' असे पद रचले आहे. आपण जितके काम करतो प्राय. तितकी च विश्रांति घेतो. पण एका वस्तूला कधीं च विश्रांति मिळत नाही. ती म्हणजे प्राण. जागे असताना आणि झोपेंत प्राणाचें काम चाललेले च असतें. योगी जेव्हा समाधींत असतात— प्रज्ञासमाधि नव्हे ध्यानसमाधि—तेव्हा प्राणाला कांहीं तरी विश्रांति मिळते. सामान्य लोकांची अशी स्थिति असत नाही. माणूस देहांतल्या सर्व इंद्रियांना विश्रांति देतो पण प्राणाला देऊ शकत नाही. या प्राणाला विश्रांति देण्यासाठी च मरणाची व्यवस्था केली आहे. साधारणतः दिवसा आपण जितके काम किंवा परिश्रम करतो, तितकी च रात्रीं विश्रांति मिळते. त्याप्रमाणे जीवन जितके दीर्घ तितकी च मरण निद्रा हि दीर्घ

असते त्यानंतर जागरण म्हणजे नूतन जीवन लाभते. मरणनिद्रेमध्ये स्वप्नें पडली, तर ती स्वप्ने पुष्कळ लांब म्हणजे ५-६ वर्षांची असणार तें स्वप्न जर वाईट असेल तर माणूस नरकांत गेला आणि स्वप्न चांगले असेल तर तो स्वर्गात गेला म्हणतात आपण रात्रीचे स्वप्न पाहतो त्याचे बरे वाईट परीणाम हि दृष्टीस पडतात कोणी कोणी तर रडू लागतात झोप मोडल्यानंतर स्वप्नातील दु ख दूर होते परंतु झोपेमध्ये वाईट स्वप्नाच्या वेळी डोळ्यातून खरोखरचे पाणी येतं ते तात्पुरते असले तरी सत्य च असते. मरणनिद्रेतील स्वप्न दीर्घ काळ चालणारे असल्यामुळें त्याचा परिणाम हि मोठा असतो तात्पुरते म्हणून त उडवून देता येणार नाही आणि कोणाला ही मरणरूपी दीर्घनिद्रा नि स्वप्न लाभली तर त्याला स्वर्ग किंवा नरक भोगावा लागत नाही तो तेव्हा ब्रह्मलोकात असतो. स्वप्नात आपण किती हि पुरुषार्थ केला तरी तो खरा असत नाही स्वप्नात आपण जीं बरोवाईट कामें करतो, बरेवाईट भोग भोगतो, हे जे अनुभव असतात ते सर्व मिथ्या असतात परंतु त्यावेळी जे सुख किंवा दु ख भोगावे लागते ते खरे च असते शास्त्रकारानी स्वर्गनरकासबंधी असे म्हटले आहे– नाना प्रकारच्या अनुभवाचे संस्कार स्वप्नात येतात हे संस्कार च स्वप्नामध्यें काम करीत असतात वाईट संस्कार असतील तर वाईट स्वप्नें पडतील

एकदा भारतन कुमारअप्पा यानी तुम्हाला कधी स्वप्न पडते का ? असे विचारले हाते हल्ली फार च कमी पडतात असे त्याना मी सांगितले. ते म्हणाले विद्यार्थी दर्शेत आपल्याला परीक्षा देत असल्याची स्वप्नें पडत नयी तालीम योजनेमध्यें परीक्षेची काही व्यवस्था नाही म्हणून त्याना फार आनंद वाटला

महाभारतामध्ये भीष्म शरशय्येवर पडल्याची कथा आहे मला त्या शरशय्येचे स्वप्न पडले होते त्यात तर भीष्म त्या शरशय्येवर निर्विकारपणे झोपल्याचे दिसून आले पण ती बाणांची टोकें मला बोचत होती. मनावर जेवढे संस्कार झालेले असतात तेच आपण स्वप्नात पाहतो अर्थात् आपण जर या जोवनांत सत्कर्में केलें असेल तर आपणास स्वर्ग भोगावयास मिळता. आणि वाईट कर्मं केलें असेल तर नरक भोगावा लागतो

आणखी एक गोष्ट ज्यानीं पुण्यकर्मे केली त्याना स्वर्ग-भोगानंतरच्या पुनर्जन्मात चांगल्या जीवनाचा, सजीवनाचा लाभ होतो. हें च त्याचे खरें फल. त्याचप्रमाणे नरक-भोगानंतरचे मिळणारें जीवन दुर्बुद्धियुक्त जीवन असेल आणि, नि.स्वप्न मरणनिद्रेनंतर अर्थात् ब्रह्मलोकानंतर जो जन्म प्राप्त होतो तो समत्वबुद्धियुक्त असतो आणि याप्रमाणे दोन तीन जन्म झाल्यानंतर जन्म संपतो. म्हणजे मुक्ति लाभते, सद्बुद्धियुक्त, दुर्बुद्धियुक्त अथवा समत्वबुद्धियुक्त जीवन म्हणजे च स्वर्ग, नरक किंवा ब्रह्मलोक होय असें दर्शन मला झाले आहे.

कुराणात म्हटले आहे, एक तोळा पुण्य केलें तर दहा तोळे फळ मिळतें, पण एक तोळा पाप केलें तर एक च तोळा पाप मिळतें. आई आपल्या मुलांशी असा च तऱ्हेनें वागते. आईचें मुलांशी वागणे जसें स्नेहपूर्ण असतें त्याप्रमाणे ईश्वरानें हि प्रेमयुक्त शासन करण्याची सोय केली आहे."

* * *

कार्यकर्त्यांच्याबरोबरचें भाषण संपल्यावर थोड्या च वेळानें ग्राम-प्रमुखांची बैठक झाली. या बैठकीत S. D. O. साहेब C. O. साहेब ई. पी. आर् चे मेजरसाहेब आणि कांहीं युनियन कौन्सिलचे मेंबर उपस्थित होते.

**मनुष्याच्या अंतःकरणांत प्रवेश करण्याचें द्वार—गुण. प्रवेशाला बाधक—द्वेष**

"विनोबा त्यांना म्हणाले–मी पूर्ण विश्वासानें श्रद्धा ठेवून च जनतेकडे जातों. मानवाच्या अंत:करणांत प्रवेश करावयाचा असेल तर त्याच्या गुणांमधून च करावयास पाहिजे त्याच्या दोषांतून प्रवेश करण्याचा प्रयत्न केला तर भिंतीवर डोकें फोडल्यासारखें होईल. मनुष्याचे गुण म्हणजे घराचा दरवाजा आणि दोष म्हणजे घराची भिंत मारसाच्या ब्बड-तोंड्यांत मी गेलों होतों. त्याठिकाणीं पुष्कळ वर्षांपासून दरोडेखोरांचा उपद्रव होता. सरकारी पोलीसांना तो उपद्रव आवरता आला नाहीं. त्या ठिकाणीं वीस दरोडेखोरांनीं आपल्या बंदूकांसह आमच्यापुढें आत्मसमर्पण केलें. मी त्यांना पोलीसांच्या ताब्यांत दिलें. त्यांनीं माझ्या आवाहनाला जें प्रत्युत्तर दिलें त्याचें

कारण त्याच्यामध्यें जरी शेंकडो दोष होते तरी त्याच्या गुणावर हि माझा विश्वास होता हे होय आईजवळ मुलानें एखादी वस्तु मागितली तर ती त्याला नाही म्हणू शकत नाही उसनी आणून हि त्याला देते याचे कारण मुलाचा आईवर पूर्ण विश्वास असतो म्हणून च तो आईजवळ मागतो मी हि या मुलाच्या विश्वासानें जनतेकडे जातो आणि मागतो म्हणून जनता मला नाही म्हणू शकत नाही"

विनोबाचे हें भाषण सपता च एका युनिअन कौन्सिलच्या चेअरमनने एक एकर जमीन देत असल्याचे जाहीर केले. बाबानी त्याचा हात धरून त्याला शाबासकी दिली गावच्या प्रमुखाची बैठक अशा प्रकारे सपली.

प्रार्थनासभा नेहमीप्रमाणे ४ वाजता सुरू झाली मैदान भिजले होते पण सर्व लोक त्या जमीनीवर शात बसले होते त्या लहानशा जागी हि दहा हजार लोक उपस्थित असावेत विनोबाजी आपल्या भाषणात म्हणाले--

## गरीब श्रीमंत निर्माण करून ईश्वर लोकाची परीक्षा बघतो

आपल्या समाजात गरीब श्रीमत असे दोन्ही प्रकारचे लोक आहेत. असे का होते ? कुराण सागते 'परीक्षेसाठी' ज्याप्रमाणे शाळेंत विद्यार्थ्याची परीक्षा घेतली जाते, त्याप्रमाणे ईश्वराच्या हि दोन प्रश्नपत्रिका आहेत. एक असते गरीबासाठी व दुसरी श्रीमतासाठी गरीबाच्या प्रश्नपत्रिकेत असते की तुम्हाला नाना प्रकारची दु खें भोगावी लागतील तरी तुम्ही सत्य बोलावें खोटें बोलू नये सत्याने चालावें चोरी करू नये. निर्भय व्हावे स्वत ला असहाय्य आणि दुर्बल मानू नये दारू पिऊ नये किंवा अन्य मादक पदार्थ खाऊ नयेत आणि, ईश्वराचे नाव घ्यावे गरीब जर याप्रमाणे चालतील तर ते पास होतील श्रीमताच्या प्रश्नपत्रिकेत असते की, तुम्हाला मी श्रीमत केले आहे परतु दु खी माणसाविषयी तुमच्या मनात प्रेम असते ना ? त्याचे दु ख दूर करण्यासाठी तुम्ही झटता ना ? कोणाला फसवीत नाही ना? अहकार मिरवीत नाहीं ना ? देवाचे नाव घेता ना ? या सर्व गोष्टी तुम्ही करीत असाल तर तुम्ही पास व्हाल. पण तुम्ही जर भोगविलासात मग्न असाल, दु खी लोकाना सहाय्य करीत

नमाज, लोकांना फसवीत असाल, केवळ पैशाचा संग्रह करीत असाल, व्यापार करताना जिनसात भेसळ करीत असाल तर तुम्ही परीक्षेत नापास व्हाल. याप्रमाणे ईश्वर दोघाची हि परीक्षा घेतो कोणा हि विषयीं पक्षपात न दाखविणारा, सच्चा इमानदार, हृदयात प्रेम असणारा, परदु:खानें कळवळणारा, ईश्वराचे नाव घेऊन त्यावर भार टाकणारा असा मनुष्य ईश्वराला प्रिय असतो. तुमच्या मिळकतीचा काही भाग गरीबाना द्या, असा कुराणाचा आदेश आहे. गरीबाविषयी प्रेम दाखवा. कर्ज देऊन व्याज घेऊ नका. हें च मी सर्वठिकाणी सांगत आलो आहे.

भारतात ४० लक्ष एकर जमीन मिळाली आहे. एकरी १०० रुपये किंमत धरली तरी ४० कोटि रुपये तिची किंमत होईल. येथें हि १५० बिघ्यापेक्षा जास्त जमीन मिळाली आहे. एवढी जमीन मिळाली पण हे बाबाचे हात पहा. त्याला कणभर हि माती लागली नाही. जर ४० कोटी रुपये जमविले असते तर सर्व करण्यासाठी, त्याचा हिशोब ठेवण्यासाठी केवढा संसार उभा करावा लागला असता ! पण जें भूमिदान मला मिळाले त्याचा कसला च बोजा मला नाहीं. मी मध्यांवाटीं साडेनात वाजता झोंपतों व दोन मिनिटात मला गाढ झोंप लागते.

मी लोकांना चार गोष्टी मागत असतो. पहिली गोष्ट जमीनीचा मालक परमेश्वर आहे. कायद्यानें कोणी जमीनीचा मालक असेल हि परंतु ईश्वराच्या नियमाप्रमाणें कोणी ही जमीनीचा मालक नाहीं. ज्याप्रमाणें हवा पाणी यांचा कोणी मालक असत नाहीं, त्याप्रमाणें जमीनीचे आहे. दुसरी गोष्ट व्याज घेणें सर्वस्वी बंद झालें पाहिजे. सर्व धर्मात व्याजाचा निषेध आहे. ईस्लाम धर्मात तर त्याचा विशेषच निषेध आहे. तिसरी गोष्ट हा मनुष्यदेह मद्यपान किंवा इतर मादक पदार्थांनी दूषित करू नका. सर्व मादक पदार्थ सोडून द्या. आणि चौथी गोष्ट सर्वांनीं मिळून एकत्र भगवंताचे नांव घ्या. भगवंताचे नांव एक एकट्याने हर घ्यावें च पण वेगवेगळ्या धर्मांच्या लोकांनी एकत्र हि घ्यावे. त्याशिवाय अनेक धर्मांचे, अनेक संप्रदायांचे, अनेक भाषांचे लोक, बाल-वृद्ध, स्त्री-पुरुष शिक्षित-अशिक्षित

या सगळयानी एकत्र येऊन भगवताचे नाव घ्यावे काही वर्षापूर्वीपासून मी जेव्हा मौनप्रार्थना सुरू केली तेव्हापासून आजपर्यंत कोटयावधि लोक या मौन प्रार्थनेत सामील झाले आहेत. जगातले लोक जर कोणत्या समयी प्रेमाच्या सूत्राचे बाधले जातील, एक-हृदय होतील, ऐक्यबद्ध होतील तर ते ईश्वराच्या नावाने एकत्र होतील. म्हणून सामुहिक मौनप्रार्थना सगळया देशात सुरू होणे आवश्यक आहे".

भाषण आटोपल्यानतर नित्याप्रमाणे पाच मिनिटें मौन प्रार्थना झाली मौनप्रार्थनेनंतर आज मिळालेल्या दानाची घोषणा करण्यात आली.

---

## ग्रामराज्य--विश्वराज्य : १४ :

[दिवस चौदावा, १८ सप्टेंबर. आलोकदिहि ते खुशालपूर अंतर ९॥ मैल]

पहाटे साडेतीन वाजता यात्रा सुरू झाली सुमारे दीड तासाने आत्राई नदी ओलाडली नदी ओलाडल्यावर अधारात कदिल घेऊन एक वृद्ध बाई उभी असल्याच दिसून आले तिच्या एका हातात पाण्याचे भाडें होते. वृद्धा बाबाना प्रणाम करून म्हणाली, 'बाबा चरणामृत द्या.' बाबा तिचा हात धरून म्हणाले त्याची काहीं जरूर नाही मी हि तिला नको म्हणून सांगितले. तेव्हा ती वृद्धा म्हणाली बाबा येथें शिवमदिर आहे तेथें दर्शन करून तरी जा मी तिला नाही म्हणालो, तरी बाबानी विचारले मदिर किती दूर आहे ? वृद्धा म्हणाली येथें जवळ च आहे. बाबा मदिराकडे वळले. मदिरात जाऊन नमस्कार करून परत आले बाबा देवदर्शनाला गेल्याचे पाहून पदयात्रींतील काही लोकाना विस्मय वाटला. मुक्कामावर पोचल्यावर विचारता बाबा म्हणाले 'माझ्या मनात तर मदिरात जाऊन दर्शन घेण्याची गोष्ट च येत नाहीं मला तर सर्वत्र ईश्वरदर्शन होते. म्हणून एखाद्या विशिष्ट स्थानी दर्शनाला जाण्याची जरूरी राहत नाहीं. परतु विशेषत: या देशात या वृद्धेच्या सागण्याप्रमाणे मदिरात दर्शनासाठीं

गेलो नसतो तर या मंदिराच्या प्रतिष्ठेवर आघात पडला आणि वृद्धेच्या मनाला धक्का बसला. मी दर्शनाला गेल्याने या शिवमंदिराची प्रतिष्ठा वाचून राहिली'

वाटेत बोलता बोलता बाबा म्हणाले होते, दिनाजपूर येथें जमीन जास्त आहे. मी त्याना म्हणालो, जमीन जास्त असली तरी लोकांच्या हातात फार नाही सरकारनें बरी च जमीन 'अॅक्वायर' करुन या ठिकाणीं एक फार्म तयार केला आहे तो फार्म या रस्त्याच्या कडेनें च होता फार्मजवळ येतां च मी तो त्याना दाखविला. भूदान कसे मिळेल असे बाबानी विचारलें. त्याचे उत्तर विश्वमाई देतील असे मी बाबाना सांगितले. बाबा हसून म्हणाले, ग्रामराज्यातून च विश्वराज्य होणार आहे विश्वराज्य कसे स्थापन होईल याबद्दल ते सांगू लागले. मुक्कामावर पोचल्यानंतरच्या स्वागत भाषणात हा विषय त्यानीं विशद केला.

मुक्कामाचे स्थान जवळ येऊ लागले तशी गर्दी वाढू लागली. दिनाजपूरहून ९ मैलाचा टप्पा जेथें होता त्याठिकाणी एका प्राथमिक शाळेतल्या इमारतींत मुक्कामाचे केंद्र ठरविण्यात आले. त्या ठिकाणीं साडे सात वाजता पहोचलो. ती जागा पाहून मला जरा आश्चर्य वाटले. पूर्वी जेव्हा येथें आलो होतो तेव्हा मसीपूर येथील प्राथमिक शाळेच्या इमारतींत मुक्काम करावा असे ठरलें होते पण ती जागा ही नव्हती. S.D.O. साहेब म्हणाले—मी आणि D. C. साहेब यांनीं मिळून मुक्कामाचे केंद्र १ मैल अलीकडे च ठरविले आहे. या गावाचे नाव मुशालपूर आहे. ठिकाण चांगले उघडया जागीं होतें. सभोवार सुन्दर सृष्टीसौंदर्य हि होतें. म्हणून आम्ही हे स्थान ठरविलें, असे त्यांनीं सांगितलें या योगाने एक सोईची गोष्ट झाली. ती म्हणजे आमचे चालण्याचे अंतर १ मैल कमी झालें. पण उद्याचे वाढले. आजचा चालण्याचा प्रश्न सुटला होता.

मुक्कामाच्या जागी एक सुन्दर शामियाना उभारला होता. सुमारे ४००-५०० लोक जमले होते विनोबाजी त्यांना उद्देशून म्हणाले—

## विश्वराज्याची स्थापना केली पाहिजे

आता या वेळो मी जास्त बोलू इच्छित नाही आज चालणे जास्त झाल्यामुळें शरीर थकले आहे. परतु तुमच्या दर्शनाने सर्व थकवा दूर झाला आहे आपण सर्वांनी एक व्हावे अशी च जगातल्या लोकाची इच्छा आहे. या विज्ञानयुगाची पण ही च मागणी आहे हा माईक पहा याच्यामुळें लाब असून हि हजारो लोकाना माझें भाषण उत्तमप्रकारे ऐकावयास मिळते. हा माझा चष्मा पहा, हिरव्या रगाचा आहे त्यामुळें उन्हाच्या त्रासापासून डोळ्याचे रक्षण होते आणि त्याने मला दूरच्या लोकाच्या दर्शनाचा लाभ होतो. रिस्टवॉच, फाऊटनपेन इत्यादि नवीन नवीन साधने विज्ञानाने निर्माण करून आपली सोय केली आहे या सर्व वस्तु अनेक देशातून तयार झाल्या आहेत. याच्याशिवाय आपले चालणारे नाही विज्ञानामुळें सर्व देश एकमेकाजवळ आले आहेत आपल्याला लागणाऱ्या वस्तु आपल्या देशात तयार व्हाव्यात हे चागले. परतु अनेक प्रकारच्या वस्तु आम्ही परदेशातून आणतो आणि अनेक वस्तु परदेशात पाठवतो हि अशा तऱ्हेन सर्व जग एक होऊ लागले आहे. विज्ञान जसजसे पुढें जाईल तसतसे 'जगाने' एक झाले पाहिजे. असा विज्ञानाचा सदेश राहील पूर्वीप्रमाणे जग अज्ञात किंवा दूर राहिलेले नाही. पृथ्वी लहान होऊन गेली आहे म्हणून आता विश्वराज्याची स्थापना केली पाहिजे विश्वराज्याचे भारत, पाकिस्तान वगैरे देश प्रदेश होतील, पूर्व पाकिस्तान हा त्यातील एक तुकडा होईल आणि दिनाजपूर एक डिविजन आणि गाव हें एक कुटुब होईल क्रमाक्रमाने हें होणारच आहे जगातील सर्व लोक एक होऊन जाणार आहेत

## बुद्धि, डोके आणि हृदय यांचा संघर्ष चालू आहे :

आपले हृदय आतां मोठें केले पाहिजे विज्ञानयुगात माणसाची बुद्धि फार मोठी झाली आहे जेव्हा अकबर राज्य करीत होता तेव्हा इग्रज-माणसाला इग्लडहून दिल्लीला अकबराच्या दरबारात येऊन पोचायला दोन वर्षे लागली होती. तेव्हा इग्लड नावाचा एक देश आहे असे अकबराला समजले आता तर प्राथमिक शाळेतील मुलाना इग्लड कोठें आहे हें माहित आहे. आता जगाच्या कुठल्या हि कोपऱ्यातील बातमी तावडतोब एकमेकाना

कळते इराणात भूकंप झाल्याची बातमी आपल्याला लगे च समजली. प्राचीन काळी ही घटना आपल्याला कळली च नसती. आमचे ज्ञान, बुद्धि पुष्कळ वाढली आहे पण त्या मानाने हृदयाचा विस्तार झालेला नाही. म्हणून च बुद्धि आणि हृदय यामध्ये संघर्ष चालू आहे. यामुळें मनुष्याचे दुःख आणि दुर्दशा वाढत आहे कल्पना करा की एका माणसाचे डोके खूप मोठें आहे हातपाय लांब आहेत पण मधली छाती अगदी लहान आहे असे चित्र कोणी रेखाटले तर ते चित्र किती हास्यास्पद होईल? हल्ली जातीजातीत झगडे आहेत. धर्मांधर्मांत, भाषाभाषात, मजूरमालकात झगडे आहेत असे किती तरी झगडे जगामध्ये चालू आहेत पण हे सर्व हृदय आणि डोके म्हणजे बुद्धि यांच्यामध्ये आहेत असे माझें म्हणणे आहे. या विज्ञानयुगात डोके लहान करण्याचा उपाय नाही. म्हणून हृदय च मोठें केले पाहिजे ती च गोष्ट मी सांगत फिरत आहे माणसाचे हृदय मोठें करावयाचे म्हणजे आपले स्वतः चे हृदय मोठें करावयाचे माझें हृदय मोठें करण्यासाठी मी पाकिस्तानात आलो आहे. मी जर इथें आलो नसतो तर माझें हृदय तितके छोटें राहून गेले असते.

* * *

भाषणानंतर स्नान आटोपून बाबा आपल्या बैठकीवर बसले होते. इतक्यात एक महाराष्ट्रीय मुसलमान गृहस्थ बाबांच्या भेटीसाठी आले. बाबांशी ते पूर्व परिचित असावे असे दिसले. कालिंदीबाई लिहितात की "स्नान करून बाबांच्या खोलीत गेले तेव्हा एक गृहस्थ बाबांच्या शेजारी बसून त्यांच्या गोष्टी चालल्या आहेत असे दिसले ते गृहस्थ बोलत होते. आणि बाबा खूप हसत होते. बाबा त्यांना म्हणाले—तुम्ही माझ्याबरोबर नागपूर जेलमध्यें होता आपण सहा महिने एकत्र होतो सुटल्यावर कामाच्या निमित्तानें तुम्ही कलकत्त्याला गेला. तेथून पाकिस्तानात आला आहात फार च आनन्द वाटतो तुम्ही मला येथें भेटावयास आला

ते गृहस्थ म्हणाले "बरोबर आहे पण येथील सर्व लोक मला म्हणत होते, बाबा तुम्हाला कसे ओळखतील? पण माझी खात्री होती कीं तुम्ही मला ओळखाल मी या पूर्वी च तुमच्याकडे येणार होतो परंतु घरगुती अडचणीमुळें आजचा दिवस उजाडला. तुम्ही या ठिकाणी प्रेमदानाची

आणि सेवादानाची दीक्षा देत आहात, सगळे झगडे धर्म, जाती आणि मतभेद यावर उभारलेले आहेत. हे झगडे मिटविण्याचे सामर्थ्य बापूच्या नंतर आपल्यापाशी च आहे. तुमच्या कुराणासंबंधी या ठिकाणी वर्तमानपत्रात खूप टीका-टिपणी झाली. मी त्यांना सांगितले 'कुराणाच्या विरुद्ध असलेला एक हि शब्द बाबांच्या मुखातून निघणार नाही "

बाबा म्हणाले "त्या पुस्तकानें मी ईस्लामची सेवा च केली आहे. आपण त्याचा प्रचार करावा."

ते गृहस्थ निघून गेले त्यानंतर दहा वाजता पदयात्री लोक आणि कार्यकर्ते यांच्या बैठकीत बाबांचे भाषण झाले—

## विचाराच्या विकासानें च आंदोलन निर्माण होईल

आपण पाहिले च आहे की, पहिल्या दिवसापासून भूदान हा च एक मुख्य विषय धरून त्या केंद्राभोवती हळूहळू दुसरे अनेक विषय मी जोडत आहे. आज मी जें बोलणार आहे त्याचा विस्तार पुढील दोन दिवसांत करीन. हृदय आणि बुद्धि ही जर दोन्ही सारख्या प्रमाणात मोठी झाली तर सर्व प्रश्नांचे समाधान होईल येथें आल्यानंतर पाकिस्तानासंबंधी मी जे काही ग्रंथ वाचले ते माझें हृदय मोठें करण्यासाठी च. मी येथें आल्यापासून सुमारे एक लाखावर लोकांचे दर्शन मला घडले असावे असे वाटते. आज सकाळी मी म्हणालो की, आज चालून आल्यावर मला थोडा जास्त थकवा आला. परंतु लोकांचे दर्शन होतां च तो सर्व नाहीसा झाला या ठिकाणी इतक्या व्यापक प्रमाणात जें औत्सुक्य मला दिसून आलें तसे दिसेल असे मला पूर्वी वाटले नव्हते आपण एकले असाल च की, मी येथें येण्यापूर्वी पूर्वतयारीसाठी काहींनी पुढें जावे असे मंडळी ठरवीत होती. पण मी कबूल केले नाहीं कारण या देशातील सामान्य लोकांच्या हृदयावर माझा विश्वास होता मी म्हणालो—सरकारने काही हि व्यवस्था केली नाही तरी येथें माझें स्वागत कमी होणार नाही. मी एका राष्ट्रांतून दुसऱ्या राष्ट्रांत आलो आहे, व्यक्तिगत नाहीं, भारताचा प्रतिनिधी या नात्यानें आलो आहे. म्हणून पाकिस्तान सरकारने सुरक्षा वगैरेची व्यवस्था केली. तशी ती करणे त्यांच्या दृष्टीने स्वाभाविक च होतें. थोड्यावेळापूर्वी मला

एक मुसलमानभाई भेटावयास आले होते. ते पूर्वी क्विटइण्डियाच्या आंदोलनात आमच्याबरोबर होते. त्यावेळी सरकारच्या काही धोरणाविरुद्ध मी तीन दिवसांचा उपवास केला होता. सर्व राजकीय कैदी आणि आमचे हे मुसलमान भाई यांनी हि त्यात भाग घेतला होता. त्यांचा आशादेवींशी अळख आहे. आशादेवींचे पति त्यावेळी नागपूर जेलमध्ये होते. ते नई तालीम म्हणजे मूलोद्योगी शिक्षणावर व्याख्याने देत आणि माझी व्याख्याने गीतेवर असत. जेलमधून सुटल्यावर हे भाई महाराष्ट्र सोडून कलकत्त्याला गेले आणि त्यानंतर पाकिस्तानात स्थायिक झाले. डॉन वगैरे वर्तमानपत्रात माझ्यावर खूप टीका झाली. त्यावेळी ह्या गृहस्थानी माझे समर्थन केले. आणि लोकांच्या मनात डॉन पत्रात माझ्यासंबंधी केलेल्या चुकीच्या समजुती दूर करण्याचा प्रयत्न केला.

"महाराष्ट्रांत मुसलमानांची सत्ता काही काळ च होती तरी हि सुमार २०० वर्षे ती राहिली. त्यावेळी लोक परतंत्र असून हि त्यांच्या प्राणांतील धर्म अस्तंगत नव्हता. अनेक सत्पुरुष यावेळी उदयास आले. ज्ञानेश्वरांच्या रचनेनंतर साठ वर्षांनी च प्रथम मुसलमानी रियासतीचा आरंभ झाला आणि शिवाजींच्या उदयापर्यंत त्यांचा अमल राहिला. या दरम्यानच्या काळांत आमच्याकडे अनेक सत्पुरुष जन्मास आले आणि त्यांनी धर्मशिक्षणाचे काम केले. त्यांची वाणी धर्माची निर्भय देत होती, केवळ, केवळ हिंदु धर्माची नव्हे. त्यांची वाणी सर्व धर्मांना सामावणारी प्रेम आणि करुणेची वाणी होती. राजनीति निरपेक्ष त्यांचा प्रचार होता. त्यानंतर इंग्रजांचे राज्य आले. सर्वप्रथम बंगालमध्ये इंग्रजांच्या राज्याला सुरुवात झाली. राममोहनरायनंतरच्या ५० वर्षांत बंगालमध्ये जितके सत्पुरुष जन्मास आले, तितके दुसऱ्या भागांत हि कोठे जन्मास आले नाहीत. सर्व भारतासंबंधी असे म्हणता येईल. त्यांनी शिक्षण, समाजसुधारणा, प्रार्थना, भक्तिमार्गाचे स्थापन, अध्यात्मसाधनेचे प्रचलन आणि समाजाचे सुधारण इत्यादि कार्ये केली. दीर्घकाळ हे लोक जागृति उत्पन्न झाली, मग काँग्रेसची स्थापना झाली आणि गांधींजींचा उदय झाला. त्यांनी काँग्रेसमध्ये सत्याग्रह आणि

सामाजिक सुधारणा ही दोन्ही कामे एकत्र केली. शिवाजीने हि असे च केले होते. फ्रेंच क्रातीपूर्वी व्हिक्टर ह्यूगो यानी साहित्यक्षेत्रात आणि रूसो व्हॉल्टेअर यानी चिंतनक्षेत्रात क्राति घडवून आणली होती. सर्वत्र असे दिसून येईल की, मोठमोठ्या राजकीय आदोलनापूर्वी सास्कृतिक आदोलनें झाली होती आणि त्यामागें एक वैचारीक भूमिका होती.

## विश्वराज्याची वैचारीक भूमिका–ईश्वर एक–माणूस एक

"या देशात हिन्दु आहेत ते 'आपण' अल्पसंख्य आहोत, आपल्याला काही अधिकार नाहीत' असे समजतात कायद्यानें धार्मिक स्वातंत्र्य दिलेले आहे. तरी संभव आहे की खालच्या पातळीवर ते तसे नसेल परंतु सध्याचे युग हे लोकशाहीचे युग आहे आणि देशाचे उत्थान निश्चित होणार आहे ही गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे विश्वराज्याची कल्पना लोकाना मान्य करावी च लागेल. सकाळी मी या विषयावर बोल्लो होतो. दोनचार वर्षात त्या दिशेनें किती प्रगति होते यावरून त्याचा अदाज काढणे बरोबर होणार नाही भविष्यकाळी जी सामाजिक क्राति होणार आहे तिचे तुम्ही अग्रदूत होणार आहात. मी स्वत. राजकारणात पडणार नाहीं कोणाला निवडणुकीसाठी उभा करणार नाही पॉलिटिक्स पासून दूर च राहणार आहे याप्रमाणें आपण प्रेमविस्ताराचे काम केले तर कोणती च शक्ति आपल्याविरुद्ध उभी राहणार नाही. त्याचे प्रमाण ही पदयात्रा होय मी पाकिस्तानात आल्यामुळें घोटाळे उत्पन्न होतील असें म्हणून पाकिस्तान सरकार मला पाकिस्तानांत येण्याची परवानगी नाकारू शकलें असते. परतु त्यानी परवानगी दिली. परराष्ट्र मंत्री महमद अल्ली म्हणाले–या पदयात्रेचा प्रभाव केवळ भारतात पडणार नाही तर सर्व जगावर पडेल.

आपण दूर दृष्टि ठेवून काम केले पाहिजे. साधुसंतांचा विचार व्यापक होता. त्याना व्यापक विश्वाचें दर्शन झाले होते. त्याप्रमाणे च आमची बुद्धि व्यापक होण्याची जरूरी आहे. हृदयाशी हृदय जोडणे हें च आपलें ध्येय असले पाहिजे. सर्वांमधें निर्भयता उत्पन्न केली पाहिजे. देहासक्तीचे भय आणि लोभ सोडला पाहिजे. आपल्या देहाचे भय आपल्या

सेवेच्या कामासंबधीं एका प्रश्नाला उत्तर देताना विनोबा म्हणाले "हे सेवेचे काम ग्रामदानाच्या उच्चतम पातळीवर ठेवून भूदान, सर्वोदय-पात्र इत्यादि नाना प्रकारची गरीबाच्या सेवेची कामें केली पाहिजेत. भारतामध्यें सर्वोदयपात्रातून मिळणारे धान्य, सर्वोदय सेवकाच्या उदर-निर्वाहासाठी वापरावे असे मी सांगितले आहे. परंतु ह्या देशात सर्वोदय-पात्रातून मिळणारे धान्य आणि पैसा सर्व च गरीबाच्या सेवेसाठी वापरावा आणि एखादी केंद्रीय संस्था स्थापन झाली तर तिच्यासाठी एकपष्ठांश साठवून ठेवावा कार्यकर्त्यांच्या उपजीविकेसाठी त्याच्या मित्रानी च तो भार पत्करावा

आज आमच्या पदयात्रीदलात एक नवीन भगिनी सामील झाली. ती डाका येथें महिलाशिक्षाण मंदिराच्या गर्ल्स हायस्कूलमध्यें शिक्षिका आहे. नांव बेगम सेलीना बानु "सुरवातीपासून विनोबाच्या पदयात्रेंत सामील होण्याची तिची इच्छा होती परंतु मुलाचे आजारीपण आणि सांसारिक जबाबदारी यामुळें यायला उशीर झाला आता अखेरचे दोन दिवस तरी बाबांच्याबरोबर राहावयास मिळेल असे ती म्हणाली. मी तिला म्हणालो बाबाच्या बरोबर कांही चर्चा करावयाची असेल तर तशी हि संधि मिळेल ती म्हणाली मला चर्चा करावयाची नाही. त्याचे भाषण ऐकावयास मिळावे आणि कांही काळ त्याचा सहवास मिळाला म्हणजे मला पुरे आहे रात्रीं तिने येथें च मुक्काम केला आहे. यात्री-दलांतील भगिनींशी तिची चांगली च गट्टी जमली.

* * *

सध्याकाळी ४।। वाजता प्रार्थना सभा झाली. सर्व मैदान भरून बाहेर रस्त्यावर हि अनेक लोक उभे होते. सुमारे १०-१२ हजार लोक असावेत प्रार्थना सभेंत विनोबा म्हणाले–

## ज्ञान वाढलें पण प्रेम कंद झाले आहे

आज आमच्या पाकिस्तान यात्रेचा चौदावा दिवस आहे. आणखी दोन दिवस मी आपणामध्यें आहे इस्लामच्या मुल्लांना जें ज्ञान असते तितके पूर्वोच्चाराठी मोठ्या लोकांना देशील नव्हते. जगामध्यें किती देश आहेत

याविषयीचे ज्ञान लोकाना अगदी थोडें होते. हल्ली तर शाळेंतील लहान मुलाला याची पुष्कळ माहिती असते.

एका बाजूने जसें ज्ञान वाढले आहे तशी दुसऱ्या बाजूनें भोगाची साधनें हि वाढत आहेत. हल्ली एका ठिकाणी राहून जगातील सर्व देशातील खाण्याच्या वस्तू मिळतात. अमेरिकेत पाकिस्तानचा आंबा मिळतो. या देशात हि परदेशातून खाण्याच्या नाना प्रकारच्या वस्तु येतात. दूध हि येतें. पूर्वीच्या काळी पोटात कोणाला व्रण झाला तर त्याला त्या दु.खानें ओरडत बसावे लागे. कोणाला एखादें औषध मिळाले तर मिळाले. हल्ली तर विज्ञानाच्या सहाय्यानें त्याला क्लोरोफॉर्म देऊन त्याच्या पोटातील कुजलेला भाग काढून टाकण्यात येतो आणि पोट शिवून टाकण्यात येते. त्याला वेदना तर होत नाहीत च पण आपले पोट फाडले होते हे हि त्याला समजत नाही. क्लोरोफॉर्म उतरल्यावर आपल्यावर शस्त्रक्रिया केली आहे हे त्याला कळते. अशाप्रकारच्या नाना सुखसोई मनुष्यास लाभल्या आहेत. परतु तरी हि माणूस सुखी नाही. ज्ञान पुष्कळ वाढले आहे, भोगाची साधनें वाढली आहेत, परतु भोगवासना त्यापेक्षा हि वाढत चालली आहे. त्यामुळें असतोष वाढत आहे. ज्ञान वाढत आहे पण प्रेम वाढत नाही. मनुष्याची बुद्धि खूप वाढली आहे परतु हृदय वाढले नाही उलट छोटें झालें आहे. अशा स्थितीत मनुष्याला दु ख होणार च यात शका नाही

आमची वासना सगळ्या दुनियेपर्यंत विस्तृत झाली आहे म्हणून परस्परसबध आणि जाणेयेणे खूप जलद झाले आहे. वासनेनें जग एक होऊन गेले. परतु दु खाची गोष्ट ही आहे कीं, आमचे प्रेम घरामध्यें च बद होऊन पडले. प्रेम एका घरात कैदी करून टाकलें गेले. वासनेनें सगळ्या जगाशी सबध आला. प्रत्येकजण आपली वासना तृप्त करण्याच्या कामी निमग्न आहे आणि त्यासाठी इकडे तिकडे धावत आहे. स्वतःच्या मुखापलीकडे दुसऱ्याकडे पाहावयास त्याला फुरसत च नाही.

## शक्ति वाढली आहे–भक्ति वाढली नाहीं

म्हणून ज्ञानी लोक म्हणतात की, हल्लीच्या परिस्थितींत विश्वराज्य जितक्या लवकर शक्य होईल तितक्या लवकर स्थापन झाले पाहिजे.

आजकालच्या विज्ञानयुगामध्यें आमची शक्ति जितकी वाढली आहे तितके च आमचे हृदय हि मोठें केले पाहिजे. हल्ली कुत्रा हि आकाशात ५०० मैल उंचीवरून पृथ्वीला प्रदक्षिणा करू शकतो. आज जितकी शक्ति वाढलेली आहे तितकी भक्ति वाढली नाही शक्ति आणि भक्ति याच्यामध्यें द्वंद्व चालले आहे. आता शक्ति तर कमी करता येणार नाहीं म्हणून भक्ति वाढविली पाहिजे. ज्याप्रमाणे बुद्धि वाढेल त्याप्रमाणे हृदय हि विशाल केले पाहिजे, जशी वासना वाढली आहे तसे प्रेम हि वाढले पाहिजे. युरोपच्या कॉमन मार्केटमध्यें इंग्लंड शिरू पाहत आहे त्यामुळें पाकिस्तान आणि हिन्दुस्थानचे काय नुकसान होईल याविषयी चर्चा चालते. पण सगळ्या पृथ्वीचे च कॉमन मार्केट व्हावयास पाहिजे. जग आज कोणत्या दिशेनें चालले आहे ते आपण समजावून घेतले पाहिजे.

'सुखी गावाची कथा' या नावाचे एक पुस्तक एका चिनी लेखकानें लिहले आहे. त्या गावात अन्नधान्य आणि आवश्यक त्या सर्व वस्तू गावात च तयार होत, त्यामुळें त्याना कोठें हि बाहेर जावे लागत नसे. इतके अगदी जवळ एकादे गाव आहे हे हि त्याना माहीत नसे. तरी पण रात्री दुरून कुत्र्याचें भुकणे ऐकू आल्यावरून येथून जवळ च एक गाव आहे एवढें ते अनुमान करीत, इतकें ते गाव अलिप्त होते. मी जेव्हा स्वातंत्र्य-युद्धात जेलमध्यें होतो तेव्हा तेथील कैदी आपल्याला सुटण्याचे दिवस किती उरले याची गणती करीत असत. परंतु तुरुंगात कबूतरें हि होतीं. त्याना असली काही चिंता नव्हती. कारण तो तुरुंग, तो तेवढी च त्याची दुनिया होती.

संकुचित राहणे आणि दुसऱ्याला संकुचित करून ठेवणे याचे युग निघून गेले आहे. आता सर्वांनी च मोठें व्हावयास पाहिजे, नाही तर सर्वांचा च नाश होऊन जाईल. १७ वर्षांपूर्वी जपानच्या एका शहरावर अणुबाँब पडला, त्यामुळें लक्षावधी लोक ठार झाले-लक्षावधी लोक जखमी झाले. हल्लीचे जे अणुबाँब तयार केले जात आहेत त्याची शक्ति त्या बाँबच्या हजारो पटीनें जास्त आहे. मनुष्यानें हिंसेला प्रतिहिंसा म्हणून जर ही मारणाची मोहीमच शुरुवात केली तर सर्व काहीं नाश

पावेल कोणी हि विकलांग स्थितीत दुःख सहन करीत शिल्लक राहणार नसेल तर माझी या गोष्टीला हरकत नाही. मनुष्यानें ही जी भयानक शक्ति निर्माण केली आहे ती मनुष्यानें च आवरली पाहिजे. भयामुळें आणि द्वेषामुळें मनुष्यानें हे बाँब बनविले. अर्थात त्याना रोकायचे तर त्यासाठी प्रेम आणि निर्भयता हवी

## ग्राम-स्वराज्यातून च विश्वराज्य

जगामध्यें जर अगदी थोडया लोकाच्या हाती सर्व सत्ता केंद्रित होईल तर जगाच्या दृष्टीनें ती एक भयंकर विपत्तिजनक अवस्था होईल. त्याला एक मात्र उपाय आहे आणि तो म्हणजे सर्व देशात खेडापाडी ग्रामस्वराज्य स्थापन करणे व त्यातून पुढे विश्वराज्याची उभारणी करणें. तर च जग वाचू शकेल. त्यासाठी आपण काय करायचे ? क्रुश्चेव आणि केनेडी याना परमेश्वरानें सद्‌बुद्धि द्यावी अशी प्रार्थना करीत का बसायचे आहे ? आपण गावोगावी प्रेमाचा विस्तार करण्याचे काम केले पाहिजे. गरिबाला जमीन दिली पाहिजे सगळ्या गावाचे एक कुटुंब करून टाकलें पाहिजे. ज्याप्रमाणे राष्ट्रामध्यें विद्वेष आणि भय आहे त्याप्रमाणे गावात हि आहे. म्हणून गावातील सर्व भेदबुद्धि दूर करून गावानें एक झालें पाहिजे तर च जगातील प्रश्न सुटतील भूमितीमध्यें लहान त्रिकोणाच्या कोणाचे जें प्रमाण असतें तें च प्रमाण मोठया त्रिकोणाच्या कोनाचे असत लहानअक्षरामध्यें जो अर्थ असतो तो च अर्थ मोठ्या अक्षरात असतो जें गावात असतें तें च जगात असते. गाव म्हणजे छोटें विश्व आणि विश्व म्हणजे मोठें गाव आपण जर प्रेमाच्या मार्गानें गावातील सगळे भेद, झगडे मिटवून तेथें शांति स्थापित करू शकलो तर या च मार्गानें जगातील सर्व भेद, झगडे मिटवून जगात शांति स्थापन करू शकू यासाठी च मी सांगत असतो कीं, गरीबाना भूमिदान करा, सगळ्या गावाचा एक परिवार करा आणि व्याज घेणे बंद करा. जेव्हा गावची योजना गावात च होऊ लागेल, गावाची जमीन एक होईल, ग्रामोद्योग चालू होतील, कोणी व्याज घेणार नाहीं तेव्हा च ग्रामस्वराज्य स्थापन होईल"

नित्याप्रमाणे सभेच्या शेवटी मौनप्रार्थना झाली आज एक हि दान मिळाले नाही

रात्रीच्या प्रार्थनेनंतर बाबा झोपी गेले दिनाजपूरचे पोलिस-प्रमुख व आणखी एक ऑफिसर तेथें आले आणि त्यांनी विनोबा विषयीची माहिती विचारली. पूर्व-पाकिस्तान सरकार विनोबाजींना काही पुस्तके अर्पण करणार होतें, ती केव्हा द्यावीत असे सुपरिंटेंडेंट साहेबांनी विचारले. दिनाजपूरला पोहोचल्यावर आपणास जेव्हा सवड असेल तेव्हा द्यावीत असे मी त्यांना सांगितले

---

## जनशक्ति आणि राजशक्ति-- बंगाली भाषेच्या शक्तीचा विकास : १५ :

[दिवस पंधरावा, ९ सप्टेंबर, खुशाल्पूर ते दिनाजपूर अंतर ९ मैल]

यात्रा सुरू होण्यापूर्वी च बाबा बाहेर आले होते आणि शतपावली करीत होते. सर्व तयारी होऊन पदयात्री जेव्हा बाहेर आले तेव्हा बाबा मैदानात नव्हते असे दिसले महादेवीताई बरोबर रस्त्याकडे गेले असे ऐकले. काल ज्या बाजूनें आलो होतो त्या च बाजूला ते गेले होते. जयविजय दोघे हि पळत जाऊन त्यांना परत घेऊन आले चालता-चालता च प्रार्थना झाली जयविजय यांचे हात धरून बाबा Quick March केल्याप्रमाणे जलद चालू लागले पाणी घेण्यासाठी जेव्हा उभे राहिले तेव्हा म्हणाले आज तर डबल Quick March चालला आहे. मी तेव्हां विनोदानें म्हणालो, आम्हाला आता लवकर च सोडून जाणार आहात म्हणून की काय इतक्या जलदीनें चालला ? हें ऐकून बाबा थोडे हसले. महिलाशिक्षण मंदिराची शिक्षक भगिनी आज पदयात्री लोकांबरोबर चालत होती. तिला असे चालण्याची सवय नव्हती. त्यानून

बाबा अधिक च वेगानें चालत होते. त्यामुळें ती दमून धापा टाकू लागली. परतु त्यात च तिला खूप आनन्द वाटत होता शहराजवळ आलो तसतशी गर्दी वाढू लागली एके ठिकाणी स्वागतासाठी कमान उभी करण्यात येत होती. त्याच्या अदाजाप्रमाणे आम्हाला तेथें पोहोचण्यास अद्याप दहा बारा मिनिटें अवकाश होता दहा मिनिटाचे काम राहिले होते तेवढें ते पुरे करू शकले नाहीत जवळ च एक गोशाळा होती, ती पाहायला येण्याची विनती चालकानी केल्यावरून बाबा तिकडे गेले. पण गोशाळेंतील लोक तेव्हा उठू लागले होते काही तयारी नव्हती. गोशाळेंत च एका मोकळ्या जागी उभें राहून बाबानी सकाळचे दूध घेतले. दूध घेऊन झाल्यावर पुन्हा यात्रा सुरू झाली तशी गर्दी अधिक च वाढू लागली. *वाटेंत हार घालणे, चदन-तिलक लावणे इत्यादि प्रकारे स्वागत होऊ* लागले. अशा प्रकारे यात्रा चालली असता सुमार साडेसात वाजण्याच्या थोडे आधी दिनाजपूर येथील मुक्कामाचे केंद्र, सर्किट हाऊस येथे पाहोंचलो त्या ठिकाणीं दिनाजपूरचे डेप्युटी कमिश्नर, पोलिस अधिकारी वगैरे सरकारी ऑफिसरानीं बाबाचे स्वागत केले सर्किट हाऊससमोर मोठें मैदान होते तेथे स्वागतासाठी जमलेल्या लोकाना उद्देशून बाबा म्हणाले--

## प्रथम जनशक्ति, मग राजशक्ति आणि दोन्हींच्या संयोगानें च विकास

आपल्या पाकिस्तानाच्या पदयात्रेचे आता दोन दिवस उरले आहेत. आज तुमच्या या मोठ्या शहरात आलो आहे सभा हि मोठी होईल. उद्याच गाव लहान आहे आणि परवा सराळीं आम्ही पाकिस्तान सोडून निघून जाऊ ईश्वरेच्छा असेल तर पुन्हा हि येता येईल आपल्या दर्शनाचा लाभ झाला हें माझें सुदैव आहे. माझ्या पदयात्रेचा उद्देश प्रेमाचा विस्तार करणें हा आहे. केवळ तुमच्यावर च नव्हे तर सर्व जगावर माझें प्रेम आहे. ज्याचे जगावर प्रेम असतें त्याला जगाकडून हि प्रेमाचा लाभ होतो हें मी माझ्या अनुभवावरून सागत आहें. येथें येण्यापूर्वीपासून च आपणा सर्वांचे प्रेम मला लाभेल असा मला विश्वास होता. परतु ते प्रेमाचे ज्ञान बौद्धिक होतें. या पधरा दिवसात प्रत्यक्ष अनुभूति मिळाली. तुमच्या

प्रेमाच्या बदल्यात देण्यासारखें मजजवळ काही नाही पण माझी इच्छा आहे की, आपण गरिबाचे दु ख दूर करावे, भूमिहीनाना जमीन द्यावी, अशा रीतीने त प्रेम प्रकट करावे लोकाचे दु ख दूर करण्याची जबाबदारी सरकारची आहे ही गोष्ट खरी परतु त्यासाठी प्रथम सामान्य लोकाचा उद्योग आणि शक्ति त्या कामी लागली पाहिजे, सामान्य लोकाचा उद्योग आणि शक्ति, आणि सरकारची मदत व शक्ति ही एकत्र जुळून आली तर च काम योग्य प्रकारे होईल एका हातान टाळी वाजत नाही तिला दोन हात पाहिजेत त्याप्रमाणे च जनतेचे परिश्रम आणि सरकारची मदत या दोन हातानी टाळी नीट वाजेल माझें तर असे म्हणणे आहे की, सामान्य लोकाचे परिश्रम हे वरच्या हातातला 'जबर'—आणि सरकारची मदत ही खालच्या हातातला 'जेर'—आहे

## सपत्ति दानानें च वाढेल—व्याजानें नाहीं

पाकिस्तानातील प्लॅनिंगची मला विशेष माहिती नाही, पण भारतातील पचवार्षिक योजनेसाठी ५८०० कोटी रुपये खर्च होणार आहेत हिशेबानें पाहिलें तर हा खर्च माणशी प्रतिदिनी एक आणा एवढा च होता त्यामुळें मी या योजनेला एक आणा योजना म्हणतो पाकिस्तानमध्यें हि बहुधा अशी च योजना असावी किती तरी गाजावाजा करून, परदेशातून सहाय्य मिळवून मग ती याजना पुरी व्हायची आणि मग इथली रोजची मजुरी दोन रुपये व्हायची तासाला चार आणे म्हणजे १५ मिनिटाला एक आणा अर्थात सरकार प्रतिदिवशी जो एक आणा खर्चून प्रचड योजना आखीत आहे ती म्हणजे येथल्या मजुराची १५ मिनिटाच्या मजुरी इतकी तिची किंमत झाली! सरकारच्या शक्तीशी तुलना केली तर सामान्य लोकाची शक्ति केवढी मोठी आहे तुमच्या लक्षात येईल सरकारी मदतीची अपेक्षा न राखता तुम्ही गावकरी मिळून मिसळून जें काम कराल तें च खरे काम सरकारनें मदत केली तर हें काम आणखी वाढू शकेल म्हणून तुम्ही आपलें प्रेम प्रकट दिसण्याकरिता गरिबासाठीं काहीं द्या जमीन नसेल तर तुम्ही दुसरे काही हि दान देऊ शकता ज्याला बुद्धि विद्या आहे त्यानी बुद्धिदान, विद्यादान करावे प्रत्येक सुशिक्षित एक वर्षात

दहा निरक्षराना शिक्षण देईल तर पाकिस्तानात एका वर्षात कोणी हि निरक्षर राहणार नाही सरकारकडून हें होणे शक्य नाही, पण तुम्ही कराल तर काही हि खर्च न करता थोड्या च वेळात ते करून टाकाल

तुम्ही पाहता की मी मोकळ्या हातानें इथें आलो आणि मोकळ्या हातानें च परत जाणार आहें माझी स्वत ची काही हि संपत्ति नाही घर नाही बँकेत पैसा नाही माझ्या श्रीमंत मित्राचे पाच पधरा मोठे बगले असतील पण माझी तर ३६५ घरें आहेत रोज राहण्यासाठी नवीन घर रोजच्या आहाराची मला चिंता करावी लागत नाही लोक च माझ्या खाण्या-जेवण्याची, राहण्याची चिंता करतात मी स्वत च्या अनुभवावरून सागतो, की जो प्रेमानें दान देतो त्याला त्याच्या कितो तरी पट परत मिळतें दोन हातानी दान कराल तर हजारो हातानी तुम्हाला मिळेल 'तुमची संपत्ति दानानें वाढेल, व्याजानें नाहीं' असें कुराणानें सागितल आहे म्हणून तुम्हाला जें शक्य असल तें भूदान संपत्तिदान, श्रमदान, बुद्धिदान प्रेमानें गरिबासाठी द्या '

आजचे मुक्कामाचे ठिकाण सर्किटहाऊस होतें बाबाची खोली दुसऱ्या मजल्यावर होती जवळ च डेप्युटी कमिशनर साहेब याचा बगला होता सिक्युरिटीची व्यवस्था कडक होती त्यामुळें सामान्याना बाबाचे दर्शन घेणे अवघड झालें होते परंतु नतर त्याबाबत सरकारी अधिकाऱ्याशी चर्चा करून दर्शनार्थीची सोय केली अर्धा-पाउण तासानीं बाबा बाहेर येऊन दर्शन देऊन जात

* * *

कालप्रमाणे आज हि दहा वाजता सहयात्री व कार्यकर्ते बाबाच्या जवळ जमले बाबा म्हणाले, गेल्या ३-४ दिवसात तुमच्या समोर मी जे विषय विवरले ते उच्च पातळीवरून विवरले आता मी सामान्य पातळी-वरून सर्वांना सुगम अशा भाषेत बोलाव अस विश्वरजन बाबूनी सुचविले आहे

## कार्यकर्त्यांनीं एक परिवार व्हावें

सगळ्यात छोटीशी गोष्ट म्हणजे सर्व कार्यकर्त्यांमध्यें एक कुटुंब-भावना असावी. एका कुटुंबात जसे प्रेमाचे संबंध असतात तसे प्रेमाचे संबंध कार्यकर्त्यांत असावेत. आपण गावाला एक परिवार होण्यास सांगत असतो. भूदान, ग्रामोद्योग, मूलोद्योगी शिक्षण, लहानमोठा असा भेद न ठेवणे, संयम इत्यादि विषयी गावातील लोकांशी आपण बोलत असतो. या सर्व गोष्टी कार्यकर्त्यांत असणे जरूर असते कामाच्या निमित्ताने वेगवेगळ्या ठिकाणी जरी आपण कार्य करीत असलो तरी आपण सर्व एका कुटुंबातील आहोत असे समजले पाहिजे आमच्या आचरणाचा, आमच्या परस्परातील संबंधाचा गावच्या लोकांवर प्रभाव पडला पाहिजे.

हल्लीं मी न्यू टेस्टामेंट पुन्हा वाचत आहे त्यामध्यें ख्रिस्ताचे अनुयायी त्याच्या मृत्यूनंतर कशा तऱ्हेने वागत होते, त्याचे वर्णन आहे. त्यात लिहिले आहे, ख्रिस्ताच्या अनुयायांनी व्यक्तिगत संपत्तीचे विसर्जन केले. ते सारे आपण एका कुटुंबातील आहोत अशी भावना ठेवून वागत असत' कम्युनिस्ट हि हे च सांगतात त्यांना एक स्टेट करायचे आहे. तसे करण्याला जबरदस्ती करावी लागली तरी ते करणार च. स्टेट लेव्हलवर अशी गोष्ट केली तर ती Unreal म्हणजे अवास्तविक होईल. पण ती च गोष्ट व्यक्तिगत रीत्या केली तर real म्हणजे वास्तविक होईल. लहानशा मंडळामध्यें व्यक्तिगत संपर्क राखता येतो. अशा व्यक्तिगत संपर्कामुळें परस्पराचे संशोधन होऊ शकते. परंतु स्टेट लेव्हलवर अशा-प्रकारच्या सुधारणा अवास्तविक होतात आणि त्या अमलात आणण्याकरता जबरदस्ती करावी लागते.

एखाद्या संस्थेमध्यें अगर मंडळामध्यें वेगवेगळ्या कार्यकर्त्यांना कमीजास्त वेतन असते त्यामुळें त्यांच्या जीवनमानात, राहण्याच्या पद्धतीत फरक पडतो. आम्ही आमच्या आश्रमात एकदा सर्व मजूर सुतार, विणकर, लेखक, टायपिस्ट इत्यादि सर्व लोकांचे वेतन एकसारखें करून दिले होते. ही व्यवस्था सर्वांनी संतोषाने मान्य केली होती. त्यामुळें परस्परात प्रेम वाढलें आणि एक कुटुंब-भावना सुरू झाली. याप्रमाणे जर कार्यकर्ते वागू

लागतील तर अमृतासारखा गोड अनुभव त्याना येईल. सर्व लोक समान समजून वागणे कठिण आहे असे वाटेल तशी आपल्याला सवय नाही म्हणून कठीण वाटते परंतु यातून च अमृताचे आस्वादन केल्याचा आनन्द मिळू शकेल

कार्यकर्ते जर गावामध्ये सर्वोदयपात्रे स्थापन करू शकतील तर त्यातून मिळणारं धान्य व पैसा गरिबाकरिता खर्च करावा. केंद्रीय सस्था असेल तर त्यातला सहावा हिस्सा सस्थेला द्यावा कार्यकर्त्यांची उपजीविका गावातील किंवा अन्य ठिकाणच्या लोकानी करावी किंवा गावातल्या पिकाच्या वेळी धान्य जमवून किंवा सपत्तीदान मिळवून त्याच्या उपजीविकेची व्यवस्था करावी

*   *   *

कार्यकर्त्यांची बैठक सपल्यावर "पूर्वपाकिस्तान सरकारकडून काही भेट द्यावयाची आहे तरी ती भेट घेऊन आम्ही केव्हा यावे" अशी विचारणा डेप्युटी कमिशनर साहेबानी केली. मी त्याना आता च येण्याबद्दल निरोप पाठविला एवढ्यात स्थानिक बारचे वकील बाबाना भेटावयास आले त्याना वर आणून बसविले, इतक्यात डेप्युटी कमिशनर मि. हसन यानी खूप मोठ्या पुस्तकाची बडले आणून ती विनोबाजींना अर्पण केली आणि म्हणाले, आपल्या पार्टीतील सहाजणासाठी ही सहा बडले (सेटस्) पूर्व पाक सरकारने आपणास भेट दिली आहेत. त्याना बसावयास सागितल्यावर ते थोडा वेळ तिथे बसले विनोबानी त्याना कुराण म्हणणारा एखादा काजी पाठविण्याची व्यवस्था करण्याबद्दल सागितले. दुपारी तीन वाजता पाठविनो असे म्हणून डेप्युटी कमिशनर साहेब निघून गेले

मग वकीलाच्याबरोबर भाषण सुरू झाले

"येथे किती वकील आहेत ? "पन्नास-साठ."

बाबा—'More than enough'

"No Sir, या ठिकाणी पुष्कळ कमी आहेत."

"इतक्या कमी वकीलांत काम चालते ? तसे असेल तर येथील लोकांची morality जास्त आहे" बाबाच्या या म्हणण्याचा अर्थ ज्या कांहीं

लोकाना समजला ते हसू लागले. बाबा त्याना म्हणाले 'तुम्ही गावात जाऊन माझी केस लोकाना समजावून देऊन भूदान घेऊन या '

* * *

दुपारी तीन वाजता कुराण म्हणणारे काजी हजर झाले. त्यानी उच्च स्वरानें कुराण म्हणून दाखविले. प्रथम त्याना वाटले ते 'सुरे' त्यानी म्हटले. नतर बाबानी सागितलेले म्हणून दाखविले ते गेल्यावर बाबा विश्राति घेत पडले होते एवढ्यात एक भगिनी आपल्या लहान मुलासह आत आली. नि सकोचपणे ती बाबाजवळ जाऊन बसली आणि म्हणाली, 'बाबा जगात किती अस्वस्थता आहे, किती हिंसा–प्रतिहिंसा चालली आहे तिच्यावर काही उपाय सागा ना ' ही भगिनी येथील एका स्थानिक ऑफिसरची पत्नी होती 'हे काम तर स्त्रीयानी च घेतले पाहिजे' असे बाबानी तिला सागितले. काही गोष्टी झाल्यावर ती आपल्या मुलाला बाबाच्या पुढे ठेवून म्हणाली, मी माझ्या या मुलाला आपल्याला अर्पण करीत आहे आणि त्यानें आपले च काम करावे अशी माझी इच्छा आहे. एवढ्यात मुलगा आईला बिलगला

* * *

पाच वाजता प्रार्थना होईल असे जाहीर करण्यात आले होतें. सर्किटहाऊसचे विशाल आवार गच्च भरले होते. स्त्रिया हि खूप आल्या होत्या. सुमारे १५ हजार लोक असावेत विनोबानी भाषणात सागितले–

## बंगाली भाषेच्या शक्तीचा विकास

आता पाकीस्तानातील आमच्या यात्रेचा फक्त एक दिवस उरला आहे. मला जर बगाली येती तर माझे शब्द तुमच्या हृदयाशी अधिक भिडले असते गेली चाळीस वर्षे मी बगालीचे अध्ययन केलें आहे. बगालीवर माझी खूप श्रद्धा आहे पण मला स्वत ला बोलता येत नाहीं, पण बोललेले समजतें. बगाली भाषा फार मधुर आहे. तिला मधुर आणि शक्तिशाली करण्याचे काम मागील अनेक महापुरुष करून गेले आहेत. त्यामध्यें वैदिक, वैष्णव, बौद्ध आणि इस्लाम धर्मानुयायाचा वाटा आहे. त्यात च आधुनिक युगांतील विचारधारेचा सयोग झाला आहे. तिचा आरभ

राममोहनरॉय पासून होतो. एका नदीला अनेक नद्या मिळाल्यानंतर ती जशी मोठी आणि वेगवान होते त्याप्रमाणे वैदिक ध्यानयोग, बुद्धाची अहिंसा, वैष्णवांचा प्रेमधर्म, इस्लामची सत्यनिष्ठा ही सर्व एकत्र आल्यामुळें बंगाली भाषा समृद्ध झाली आहे. आठ कोटीपेक्षा अधिक लोक ती भाषा बोलतात.

बंगाली भाषेंत लिंगभेद नाहीं, हा तिचा आणखी विशेष आहे. त्यामुळें या भाषेंतील प्रेमाचें वर्णन विशुद्ध आहे. बंगाली भाषेंतून हिन्दी वगैरे अन्य भाषांत अनुवाद करतांना या लिंगभेदामुळें कांहीं विकाराचा आभास होतो. बंगाली भाषेमध्यें दिव्यता आणि भव्यता आहे तो रमणीय आहे म्हणून बंगाली भाषा आणि या दिव्यतेबद्दल माझ्या मनांत खूप प्रेम आहे. भाषेमध्यें जितका विभिन्न संस्कृतींचा संगम होतो तितकी च त्या भाषेची शक्ति वाढते. त्या भाषेंतील संगीत समृद्ध होतें. रवीन्द्रनाथांच्या संगीताच्या नावीन्यानें बंगाली भाषेंतील जुन्या संगीताची परंपरा खंडीत झाली नाहीं. जुन्या पायावर च नवीन संगीताची स्थापना झाली आहे. बंगाली गाणीं ऐकतांना माझें हृदय उचंबळून येतें. तें गाणें केवळ कानांना सुखविते असें नाहीं तर तें जागृती देते. नाचायला प्रेरणा उत्पन्न करतें

साहित्यिक, विज्ञानसाधनेचा आणि
नव्या जुन्याचा सांधा जोडणारा आहे

पण ही विज्ञानशक्ति चालवायची कुणी ? नवीन गोष्टी पुढें खेंचत असतात आणि जुन्या गोष्टी मागें खेंचत असतात, असें दोघामध्ये द्वंद्व चालू असतें. नवीनामध्यें शक्ति असते. जुन्यामध्यें रस असता ह्या दोघाना जोडणें, नव्याचा जुन्याशी साधा जुळवून देणें, हे शिक्षकाचें आणि साहित्यिकाचें काम आहे. नवीनाच्या पुढें नेण्याच्या वैज्ञानिक गतीशी, पुरातनाच्या आध्यात्मिक अनुभवाचा याग साधण्याचें काम हे फार मोठें काम आहे. या दोन शक्ति जर न जोडता राहतील तर जुनें विच्छिन्न आणि अर्थहीन होईल आणि नवीन पथभ्रष्ट होऊन विनाशाच्या मार्गाकडे जाईल. जुन्यानें शास्त्राच्या अक्षरात अडकून पडता कामा नये नवीनाच्या प्रकाशात शास्त्राचें मर्म ग्रहण केले पाहिजे. आणि नवीनाला पुढें सरसावण्यास वाव दिला पाहिजे. मी रस्त्यानें चालताना मुलाच्याबरोबर धावू लागतो. कित्येक वेळी ते उत्साहभरात माझ्या पुढें जातात तेव्हा मोठें लोक, 'गर्दी करू नका, मागें रहा' असें त्याना सागू लागतात परंतु मुलाना मागून चालण्याची इच्छा असत नाही. शहाण्या माणसाने त्याना अधिक पुढें जाण्यास सागणे हे च त्याचें काम. तसें सागितलें तर तें काम अधिक उत्साहानें करतील-त्याप्रमाणे च नवीनाची पुढें जाण्याची गति रोखता उपयोगी नाही आणि ते शक्य हि नाही. जुन्यानी तिचें नियंत्रण करावें, त्याला अंकुश लावावा घोड्यावर बसण्याचा प्रयत्न करून पाहा घोड्याला त्याच्या इच्छेप्रमाणे पळू दिले पाहिजे पण लगाम मात्र आपल्या हातात ठेवला पाहिजे त्यामुळें घोडा ताब्यात राहतो. पण लगाम हातून सुटला तर घोडा कुणीकडे उधळेल ते सागता येणार नाही तसें च घोड्याला नीट चालता च येणार नाही. इतका लगाम खेंचून हि धरणे उपयोगी नाही.

## ह्याचें श्रेष्ठ उदाहरण-रवींद्रनाथ

शिक्षक आणि साहित्यिक यानी पक्षोपक्षाच्या वर राहून दूर दृष्टि ठेवून सर्व प्रश्नाकडे पहावें आणि त्याला चालना द्यावी. ह्याचें श्रेष्ठ उदाहरण रवींद्रनाथ ठाकूर होत. गेल्या वर्षी रवींद्रनाथाच्या जन्मशत-वार्षिकीचा उत्सव सर्व जगात साजरा झाला. परंतु त्याचें बहुतेक लिखाण बंगाली भाषेंत च आहे. या पूर्व पाकिस्तानच्या सृष्टीशी हि त्याचा खोल

मयच आला. परतु त्याची दृष्टि व्यापक होती. या व्यापक दृष्टीमुळें च त्यानी आपल्या सस्थेचे नाव 'विश्वभारती' असे ठेवले आणि या च विश्व-व्यापक दृष्टीमुळें त्याच्या साहित्याला निरतरचा शाश्वत शक्तिलाभ झाला ज्याची दृष्टी सकुचित असते ते प्रासगिक समस्यावर साहित्यरचना करतात ते त्या काळापुरती पुष्कळ प्रेरणा देऊ शकतात. पण भविष्यकाळीं त्याच साहित्य शक्तिहीन होत

लोकांमध्यें अशी एक समजूत आहे की, जसजसे विज्ञान वाढेल तसतस काव्य साहित्य कमी होत जाईल, कारण आमच्या जीवनात अनेक अज्ञात वस्तू असतील तर त्यावर कल्पनाचा साज चढवून काव्य आणि साहित्य रचता येईल गणितावर काव्य करता येत नाही कारण गणितात अज्ञात आकड्याला स्थान नाही की जें आपण कल्पनेनें भरून टाकावें ! अर्थात विज्ञानाची जेवढी वाढ होईल तितकें काव्य कमी होईल. परतु या कल्पनेशी मी सहमत नाही मार्झे मत तर याच्या अगदी उलट आहे. ही गोष्ट खरी आहे की, विज्ञानामुळें आपले जुनें अज्ञान कमी होऊन ज्ञानाचे क्षेत्र वाढत चालले आहे परतु त्याबरोबर च अज्ञानाचे क्षेत्र हि वाढत आहे त्यामुळें काव्य आणि साहित्य अधिक उच्चतर आणि विशाल होणार आहे

या विज्ञानयुगात आमच्यापैकी कोणी क्षुद्र होऊन चालणार नाही. आमची दृष्टि अधिक उच्च केली पाहिजे हे माझें लहानसें घर, हा छोटा जिल्हा, हा छोटा देह अशी सकुचित बुद्धि ठेवून आपण टिकू शकणार नाही मी च विश्व आहे विश्व माझें आहे सगळें विश्व हे माझे च अवयव आहेत असे जो म्हणेल तो च विश्वाचे नियत्रण करील. त्याच्या-च कडे विज्ञान येऊन विचारील मी कोणत्या मार्गानें जावे याचा निर्देश मला करा

मला पूर्व पाकिस्तानात येण्याची का इच्छा झाली ? सगळ्यावर प्रेमाचा विस्तार करावा एवढें च त्याचे कारण असे मी सागतो परतु वस्तुत माझें हृदय च विशाल करण्यासाठी मी येथें येऊ इच्छित होतो मी तर प्रेमाची थोडी च शिकवण देणार आहें, पण शिक्षण अधिक घेणार

आहे हा मला पहिल्या दिवशी च अनुभव आला. प्रार्थनासभा झाल्यावर एक मुसलमान युवक आला व मला जमीन दान द्यावयाची आहे असे म्हणाला. आपल्या चार एकरापैकी एक एकर जमीन त्यानें दान दिली. मी सांगितल्यावर जमीन कोणाला द्यायची हे हि त्यानें ठरवून टाकले. एक सामान्य तरुण वेताचे च शिक्षण परतु हृदय केवढें मोठें होते. हे पाहून माझ्या मनाला खूप प्रेरणा मिळाली आणि हृदय विशाल झाले. मी त्या तरुण मुसलमान दात्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणालो ईश्वर तुला दुवा देवो त्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले. ही पवित्र स्मृति मी कधी हि विसरू शकणार नाही ही स्मृति घेऊन च मी भारतात परत जाईन आणि तेथल्या बधूना सागेन माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे की, हे मोठें उदाहरण स्वीकारण्याची त्यानें सर्व लोकाना प्रेरणा द्यावी." सभेनतर नित्याप्रमाणे पाच मिनिटें मौन-प्रार्थना झाली.



# ईश्वरानें विविधता निर्मिली आहे, विरोधिता नाहीं :१६:

[ दिवस सोळावा, २० सप्टेंबर. दीनाजपूर ते विरळ, अतर साडेसहा मैल.]

पहाटें उठून लवकर सामानसुमान बाधून स्टेशनवर पाठविण्याच्या गडबडीत मी होतो एवढ्यात सुमारे तीन वाजता डाका येथील भारतीय डेप्युटी कमिशनर श्री एस्. के चौधरी आणि त्याचे एक सहकारी श्री. गोस्वामी उपस्थित झाले. पाकिस्तानात प्रवेश करण्याचे वेळी श्री. चौधरी जेव्हा विनोबाना भेटले होते तेव्हा पाकिस्तान सोडण्याचे वेळी हि आपण पुन्हा येऊ असे ते म्हणाले होते. त्या प्रमाणे ते आज आले होते व उद्या सीमेवर जाणार होते ते आल्याची वर्दी मी बाबाना दिली आणि सामानसुमान स्टेशनवर पाठविण्याची व्यवस्था करून त्याना बाबाच्याकडे घेऊन

गेलों बाबाच्या बरोबर त्याच्या सामान्य गप्पागोष्टी झाल्या. विनोबाच्या पदयात्रेच्या काळी पाक सरकारनें आणि सामान्य लोकानी ज्या उत्साहानें विनाबाच स्वागत केले त्याबद्दल त्यानी आनन्द प्रदर्शित केला.

सुमारें पावणेचार वाजता आमची यात्रा सुरू झाली दीनाजपूर शहराजवळ नदी आहे. जवळ च पुनर्भवा आणि ढेपा ह्या दोन नद्याचा संगम आहे घाटावर एक सुन्दर नाव उभी होती. नावेचा मालक आदर-पूर्वक विनोबाना नावेकडे घेऊन गेला नावेत बसण्यासाठी सतरजी अथरली होती नाव सुरू झाली. सुमारें पधरा मिनिटानी ती परतीराला पोहोचली. पलीकडच्या तीरावर कच्ची सडक होती पावसामुळें चिखल झाला होता आणि चाकोयानी रस्ता खडबडीत झाला होता. त्यामुळें सडकेवरून चालणें त्रासाचे होते. पण रस्याच्या कडेनें माणसाच्या रहदारीनें सुन्दर पाऊलवाट तयार झाली होती त्या वाटेने आरामात पदयात्रा सुरू झाली.

रोज पहाट चालताना 'अजान्'चा ध्वनि ऐकू यायचा. एके दिवशी तो ऐकू आला नाही तव्हा विनाबानी विचारले हात "आज कोठें 'अजान्'चा ध्वनि ऐकावयास येत नाही?" मी सागितले होते ऐकायला येतो, पण आपण बाचत असल्यानें तिकडे लक्ष जात नाही. शिवाय तुम्हाला थोडें कमी ऐकू येते त्यामुळें ता ऐकायला आला नसावा. आज चालताना सुमारे ४॥ वाजता 'अजान्'चा सूर ऐकू आला तसे बाबाना सागितले. बाबा तो सूर ऐकत उभे राहिले आणि स्वत हि त्या सुरात सूर मिळवून 'अजान्' म्हणू लागले.

सुंदर सकाळची वेळ होती चारी बाजूला हिरवीं शेते पसरली होती. सूर्य वर यायला अवकाश होता पण पूर्व बाजू उजळू लागली होती. झाडावर पक्षाची मधुर किलबिल ऐकू येऊ लागली. आजच्या या 'विरळ' यात्रेत जन-विरळ रस्त्यात आकाशातील वायु आणि हे पक्षी च पदयात्रि-कांचे स्वागत करीत होते. ते तर रोज याप्रमाणे स्वागत करीत होते. परंतु आज गर्दी नसल्यामुळें पदयात्रेतील अनेकांचे त्याकडे लक्ष गेले. आजच्या मुक्कामाच्या गावाचे नाव होते विरळ. रस्ता हि जन-विरळ होता. दूर



८ पाकिस्तान यात्रेतील शेवटच्या मुक्कामी पदयात्रीसह विनोबा

बसलेले-डावीकडून-पहिलीआळ रंजन, चारुचंद्र चौधरी (ग्रंथ लेखक) एस डी ओ कल्पना, झरना आशादेवी

दुसरी आळ-पूर्णेन्दुदा, विनोबाजी, मक्, कालीदी, अज्ञात अजित

उभे-श्यामुलहक, अज्ञात, केशव पटेल, विश्वरजन, जितन्द्रलाल, महादेवी, सुहासिनीदी, मदनदा

अंतरावर एखादे खेडें दिसे. जवळच्या खेड्यातून लोक येऊन मधून-मधून रस्त्याच्या बाजूला उभें राहिलेले दिसत.

चालताना रस्त्याजवळ असलेल्या गावाजवळ येता च बाबा उभे राहिले. सहा वाजले होते. तेथें च बाबानी सकाळचे दूध घेतले. पायलट म्हणून कल्पना पुढें चालली होती तो या गावात शिरली. ढाका येथील महिला-शिक्षण मंदिराची शिक्षिका हि तिच्या मागोमाग गेली. कल्पना परत आल्यावर म्हणाली वेळ होता तेवढ्यात गावातील एका घरात शिरून तियल्या बायकाशी गप्पागोष्टी करून आले तेव्हा साधुबाबा येत आहेत हं ऐकून आपली मुले घेऊन त्या रस्त्यावर येऊन उभ्या राहिल्या थोडे दूर राहून च त्यानी बाबाचे दर्शन घेतले आणि त्या परतल्या

पुन्हा यात्रा सुरू झाली. आता मुक्कामाचे अंतर फार नव्हते वाटेत East Pakistan Regiment च्या बॉर्डरची चौकी होती त्या चौकीपुढून जाताना तेथल्या ऑफिसरने बाबाचे स्वागत केलें सुमारे सात वाजता मुक्कामावर पोहोचलो. मुक्काम हायस्कूलच्या इमारतीत होता इमारत सुंदर तऱ्हेने सजविली होती. शाळेचे मुख्याध्यापक एक वयस्क गृहस्थ होते शुभ्र दाढी आणि सौम्य चेहरा त्याच्या मृदु भाषणामुळें आणि सौम्य चेहऱ्यामुळे सर्वांची दृष्टि त्यांच्याकडे आकृष्ट होई ते आज सर्व दिवसभर शाळेंत हजर होते त्यांचे नाव मौ कलीमुद्दीन अहमद याशिवाय ज्याचा विशेष उल्लेख केला पाहिजे असे एक गृहस्थ म्हणजे दीनाजपूर सदरचे सब-डिव्हिजनल ऑफिसर, काजी अझीझुल ईस्लाम साहेब याची आलोकदिही येथें च भेट झाली होती ते विनोबाची आणि पदयात्री लोकाची व्यवस्था नीटपणे करण्यासाठी नेहमी खटपट करीत असत ते जणू काही आमच्या पदयात्री दलातले च एक सदस्य आहेत अशी त्याची आमच्याशी वागणूक होती

हायस्कूलच्या मोठ्या मैदानात एका कोपऱ्यावर प्लॅटफार्म तयार केला होता तेथें उपस्थित असलेल्या सुमारे ७००–८०० लोकाना उद्देशून बाबा म्हणाले--

### शेवटचा दिवस म्हणजे परीक्षेचा दिवस

आज आमच्या पाकिस्तान यात्रेचा शेवटचा दिवस आहे शेवटचा दिवस नेहमी च स्मरणात राहतो तो मधुर गोष्टीनी भरलेला असेल तर

अधिक चांगलें कारण शेवटी जे भाव मनात राहतात ते दृढ होऊन जातात ही च गोष्ट जीवनाला हि लागू आहे. जीवनातील शेवटचा दिवस आनंदात आणि ईश्वरस्मरणात गेला असला, ज्याची सेवा मिळाली त्याशी संबंध मधुर असला, सगळ्यांना प्रेम दिलें असले आणि सगळ्यांचे प्रेम मिळाले असले, आणि अशास्थितीत मनुष्य देह सोडून गेला असला तर त्याचे जीवन सार्थक होते. याकरिता च साधक लोक सर्व जीवनभर तपश्चर्या करतात; जनतेची सेवा करतात. भगवताचे स्मरण रहावे म्हणून दुःखी लोकांचे दुःख निवारण करण्यासाठी स्वतःला विसरून कष्ट करतात. ते एवढ्या च साठी की, शेवटचा दिवस मंगलमय, स्नेहमय व्हावा. शेवटचा दिवस म्हणजे आपल्या परिक्षेचा दिवस असतो. परीक्षेच्या दिवशी मुलें जर प्रश्न-पत्रिकेतल्या प्रश्नांची उत्तरे बरोबर देतील तर पास होतील. त्याप्रमाणे च जीवनाच्या शेवटचा दिवस आपल्या परीक्षेचा दिवस असतो. त्या दिवशी जर आपण चांगले उत्तर देऊ शकलो तर आपण हि जीवनाच्या परीक्षेत पास होऊन जाऊ. परंतु मुलाने जर वर्षभर अभ्यास न करता आळसात दिवस काढले असतील तर तो पास कसा होईल ? आपण पास व्हावे असा आशीर्वाद मागण्यासाठी मुले मजकडे येतात. पण नुसत्या आशीर्वादाने तीं पास कशी होतील ? आपण जीवनात पुण्यकार्य, सत्कार्य न करता पाप करतो पण इच्छा करतो स्वर्गप्राप्तीची. 'जें सर्व जीवनभर अनुताप करतात त्यांना शेवटच्या दिवशी पश्चात्ताप करावा लागत नाहीं' असें कुराणात सांगितले आहे. पहिल्या च दिवशीं मीं भूदान मागितलें आणि तें मिळालें देखील हें गाव लहान आहे. लहान गावाचे हृदय मोठें असते. या गावाचें नाव आहे विरळ विरळ म्हणजे अद्वितीय. अर्थात् माझी अशी आशा आहे की, या गावानें आमच्या यात्रेचे सोळा दिवस पूर्ण होताना सोळा दानपत्रें देऊन आपले नाव सार्थक करावे. पहिल्या दिवशीं एक अत्यंत पवित्र दानपत्र आम्हाला मिळालें. त्यानें मोठ्या प्रेमानें दान दिलें. त्यामूळें मला फार प्रसन्नता वाटली. आज तर शेवटचा दिवस आहे. कमीतकमी सोळा दानें मला मिळावीत. बाबाच्या भिक्षेची झोळी भरून टाका. जे जमीन दान देतील त्यांनी च ती कोणाला द्यावयाची ते हि

ठरवावे बाबा मोकळ्या हाताने इथें आला, मोकळ्या हाताने च जाणार आहे.

* * *

सकाळचा फराळ झाल्यावर स्थानिक प्रमुखाशी मी चर्चा केली. विशेषत येथल्या हेडमास्तर साहेबाशी. विनोबाजी येण्यापूर्वी विश्वभाईंना जेव्हा हे स्थान पाहण्यासाठी पाठविलें होते तेव्हा च त्याना हेडमास्तराच्या सौजन्याचा आणि शांत स्वभावाचा परिचय झाला होता. मी त्याना म्हणालो आज तर शेवटचा दिवस आहे. गावातील प्रमुख लोक घेऊन तुम्ही विनोबाशी बोला. आपल्यामधून च कोणीतरी ग्रामसेवेची जाबबदारी पत्करावी अशी विनोबाची इच्छा आहे. अशा तऱ्हेची चर्चा कमीजास्त प्रमाणात प्रत्येक गावी करण्यात येत असे. तरी पण आजचा शेवटचा दिवस असल्याने येथें गंभीरपणे विचार झाला

* * *

सकाळी दहा वाजता आदले दिवशीप्रमाणे विनोबाची कार्यकर्त्यां-बरोबर सभा झाली. विनोबा म्हणाले—

हिन्दी आणि उर्दू या दोन भाषात अगदी च थोडा फरक आहे. येथल्या कार्यकर्त्यांनी उर्दू शिकले पाहिजे 'मोहब्बतका पैगाम' म्हणजे प्रेमाची वाणी या नावाचे माझें एक पुस्तक आहे. ते वाचल्यास उर्दू सहज येऊन जाईल. काश्मीरच्या पदयात्रेच्या वेळी प्रार्थनासभेंत जो प्रवचनें झाली ती त्यात आहेत. त्या ठिकाणची लोक-भाषा उर्दू. त्यामुळें अरबी –फारशी शब्दाचें अधिक मिश्रण त्या भाषणात आहे. असे मिश्रण झाले की, ते हिन्दी उर्दू होऊन जाते. म्हणून तें पुस्तक नागरी आणि उर्दू दोन्ही लिपीत छापले आहे. ती दोन्ही मिळून वाचली तर सहज च उर्दू शिकता येईल.

लोकाच्याकडून जर प्रतिसाद मिळाला नाही तर कार्यकर्त्यांनी काय करावे ? असा प्रश्न विश्वरजनभाईंनी विचारला. त्याच्या उत्तरीं विनोबा म्हणाले—कार्यकर्त्यांनी प्रथम तपचर्या वाढविली पाहिजे. दुसरी गोष्ट, नेहमी फिरत राहिले पाहिजे. मी जर आश्रमात राहून च भूदान आणि

ग्रामदानाच्या गोष्टी बोलत राहिलो असतो तर संभवतः तेथें हि काही कार्य झाले नसते आणि त्या कामाला आरंभ हि झाला नसता. बापूजी जर केवळ सेवाग्राममध्यें वसून राहिले असते तर त्याचे काम पुढें सरकले नसतें. सेवाग्रामवर बापूंचा जितका प्रभाव पडला त्यापेक्षा कितीतरी जास्त इतर ठिकाणी पडला आहे

आणखी एका प्रश्नाच्या उत्तरीं विनोबा म्हणाले—कार्यकर्त्यांमधील परस्पर विरोध दूर करण्याचे कित्येक उपाय आहेत. पहिला उपाय म्हणजे पदयात्रा. पदयात्रेंत आपण एका गावीं एक दिवस थांबतो. तेव्हां त्या दिवशीं आपले स्वतःतील दोष प्रकट होऊ नयेत अशी साहजिक च आपली खटपट असते. अशाप्रकारें रोज अभ्यास होऊं लागला म्हणजे आपले दोष कमी होऊन गुणांचा विकास होईल व परिणामतः परस्परातील विरोध कमी होतील दुसरा उपाय विस्मरण. पूर्वी असलेले विरोध मनातून पुसून टाकणें. तिसरा उपाय, कालचा माणूस आज नाही, प्रतिदिनी माणूस नवीन होत असतो ही गोष्ट लक्षात घेणें आणि चौथा उपाय म्हणजे आठवड्यातून एक दिवस एकत्र बसून समोरासमोर कोणाच्या कोणाबद्दल तक्रारी असतील त्याची चर्चा करणें आणि झालेले मतभेद अशा प्रकारें दूर करणें. अशा बैठकीला धीरेनभाईंनी 'खाली मजलिस' असें नाव दिले आहे. या मजलीसमध्यें मनात काही न ठेवता सर्वांनी मोकळेपणानें बोलायचें. एखाद्या माणसाविषयीं आपणास राग आला असेल किंवा गैरसमजूत झाली असेल तर ती गैरसमजूत पक्की होण्यापूर्वी तिचा अशा तऱ्हेनें निकाल लावून टाकायचा. त्यामुळें गैरसमजुती वाढत नाहीत.

भावनाप्रधान लोक जास्त उत्तेजित होतात आणि एकदम झगडे करू लागतात. क्षुल्लक गोष्टींचा बाऊ करतात. यासाठीं सर्वांच्या ठिकाणीं नारायण-दर्शन करणें हे सगळ्याच्या दृष्टीनें उत्तम आहे.

अहंकार असणें ही गोष्ट ऐक्याला मोठी बाधा आणणारी आहे. ज्याच्याजवळ शक्ति आहे आणि अहंकार नाही असे लोक आढळणे कठिण असतें. आपल्या शक्तीचा उगम कोठें आहे ही गोष्ट मनुष्याला उमगली तर अहंकार राहणार नाही. अनेक गोष्टी अनुकूल झाल्यामुळें त्याला शक्ति

प्राप्त झालेली असते, शक्तीचा विकास झालेला असतो. ही गोष्ट जेव्हा त्याच्या लक्षात येईल तेव्हा आपल्याला ही शक्ति कोठून प्राप्त झाली आहे याचा तो विचार करू लागेल त्याच्या विद्येचा आणि शक्तीचा तो मालक नाही मालक समाज आहे तो केवळ ट्रस्टी मात्र आहे तसे च स्वत च्या गुणाचा हि तो मालक नाही ते गुण हि समाजाचे असून आपण समाजाचे ट्रस्टी आहोत हे त्याच्या लक्षात येत

तुमच्यामध्यें ऐक्य असणे फार कठिण गोष्ट नाही ऐक्यासाठी भगवताने दिलेली देणगी तर तुमच्याजवळ आहे च तो देणगी म्हणजे आपत्ति, विपदा. कुंतीने भगवान् श्रीकृष्णाला विपत्तीचा च वर मागितला कारण विपत्ति असल्या म्हणजे च देवाची आठवण होते, त्याला आपण शरण जातो ते वरदान तर आपल्याला मिळाले च आहे

विश्वरजन बाबूनी आणखी एक प्रश्न विचारला, 'आपण म्हणतां की सर्वांच्या ठिकाणी असलेल्या ज्योतीचे दर्शन करा अर्थात् कोणाचे दोष न पाहता गुण च पहा असे म्हणावयास हरकत नाही पण पुष्कळ वेळा असे होते की, सत्यासाठी दुसऱ्याचे दोष सागावे लागतात तसे सागितले नाही तर चुकीची समजूत होऊन अनर्थ मात्र होईल या बाबतीत काय करावे?'

विनोबा म्हणाले–'आपले मन इतके उच्च ठेवले पाहिजे की, त्याला दोषाचे दर्शन न होता केवळ ज्योति म्हणजे गुण च दिसावेत परतु व्यावहारिक जीवनात दोष दिसून आले च तर प्रेमाने ते काढून टाकण्यासाठी त्याला काय जें सागावयाचे असेल ते सागितले पाहिजे किंवा जें करणे जरूर आहे ते केले पाहिजे '

सध्याकाळच्या प्रार्थना– प्रवचनापर्यंत बाबाच्या जवळ मडळीच्या भेटीगाठीचा विशेष काही कार्यक्रम नव्हता म्हणून मीं निवात वेळ पाहून बाबाच्या जवळ गलो माझें बोलणे झाले बाबानी विचारले भूदानाचे किंवा इतर काम करण्यासारखे सेवक किंवा कार्यकर्ते मिळू शकतील किंवा नाही दर्थं ? मी म्हणालो या ठिकाणी एक मोठी उणीव आहे ती म्हणजे या ठिकाणी नवीन त्यागी कार्यकर्ते तयार होत नाहीत, आणि सध्या हि विशेष नाहीत असे समाजसेवक तयार करण्यासाठी एखादी आश्रमासारखी

संस्था नाही नवीन आश्रम स्थापणे हि कठीण आहे आमच्या ज्या एक दोन जुन्या संस्था आहेत त्यात नवीन कोणी येत नाहीत. क्वचित् कोणी आला तरी त्याना शिक्षण देण्याची व्यवस्था असणे जरूर असते, ती नाही म्हणून च या ठिकाणी चांगल्या समाजसेवकाचा अभाव आहे. तरी पण मी याविषयी पुष्कळ आशावादी आहे असे दिवस येतील की जेव्हा मुस्लीम तरुणातून च आश्रमाचा आदर्श पाळणारे समाज सेवक तयार होतील परंतु त्या गोष्टीला थोडा अवकाश लागेल.

आमची ही चर्चा होण्यापूर्वी च ब्राह्मणवाडीचा एव रहिवासी जो पार्टी बरोबर कांही दिवसापासून होता, सकाळीं एका जमीदाराकडे जाऊन दानपत्र घेऊन आला होता दीनाजपूर जिल्ह्यांत प्रवेश झाल्यावर पवन बालोकदीही येथें एकमात्र दान मिळाले होते पुढच्या तिन्ही मुक्कामात दान मिळाले नाहीं. दुपारीं तीन वाजण्याच्या सुमारास बाबा कालिंदी बरोबर बाहेर आले मैदानाच्या चारी बाजूला लोकांची गर्दी होती. अर्धा तास फिरणे झाल्यावर परत इमारतींत गेले त्यावेळीं गांवचे प्रमुख लोक त्यांना भेटायला आले होते त्यांना बाबा म्हणाले—

## खरे समाजसेवक पाहिजेत

इतके दिवस माझ्या मनात येत आहे की लोकांच्या अंतःकरणात प्रेम आहे, उदारता आहे पण समाजसेवक नाहीत. सरकारी नोकर हे सेवक तर नसतेच त्यांच्या हाती सत्ता असते पण ते स्वयंसेवक असत नाहीत. जोपर्यंत समाजात स्वयंसेवक असणार नाहीत तोपर्यंत समाजाची उन्नती होणार नाहीं सर्व गोष्टी सरकारकडे सोपविल्या जात आहेत. परंतु एका हाताने टाळी वाजत नाहीं.

ख्रिश्चन लोकांनी या देशात येऊन पुष्कळ सेवेचे काम केले आहे. त्यांच्याप्रमाणे सेवावृत्ति दुसऱ्या ठिकाणी मला फार च कमी दिसून आली. दवाखाना, शाळा, साहित्यभांडार, कुष्ठरोग्यांची सेवा अशा प्रकारे सर्व प्रकारची सेवा ते करीत आहेत आमच्यात जोपर्यंत निस्वार्थी लोकसेवक केडर उत्पन्न होणार नाहीत तोपर्यंत देशाची उन्नति होणार नाहीं आमचा

एक ख्रिश्चन भाई कुष्ठ रोग्याची सेवा करीत होता. शेवटी त्याला च तो रोग झाला. परतु त्याचे त्यानें दुःख मानले नाही. उलट म्हणाला महारोग झालेल्या लोकाना काय दु ख होतें हे समजण्यासाठी च परमेश्वरानें मला हा रोग दिला आहे. अशा प्रकारे त्या रोगानें स्वत पीडित झाल्यावर हि प्रसन्न चित्तानें तो महारोग्याची सेवा करीत राहिला. अशा तऱ्हेचे एक दोन सेवक जरी मिळतील तरी देशाचे काम होईल ही जी पाकिस्तानात १५० बिघ्या-पेक्षा थोडी जास्त जमीन मिळाली आहे, तिच्यातून १०० लोकाचे दु.ख दूर करण्याचे साधन प्राप्त झाले आहे याप्रमाणे आपण थोडें थोडें कार्य करीत राहिला तर बरे होईल. तुमच्यापैकी कोणाला हे काम आपण करू असे वाटते काय ?

* * *

पाच वाजता प्रार्थना सभा सुरू झाली. हायस्कूलच्या पटांगणात अफाट जनसमुदाय जमला होता सुमारे १४-१५ हजार लोक असतील. विनोबाजी आपल्या भाषणात म्हणाले–

## विविधतेमध्यें च प्रेमाचा विकास

आज आमच्या पाकिस्तानी पदयात्रेचा शेवटचा दिवस आहे. ईश्वराची इच्छा असेल तर आम्ही उद्या येथून निघून जाऊ. तुमच्या-मधें मी सोळा दिवस राहिलो त्यात तुमच्या प्रेमपूर्वक चेहऱ्याचे च दर्शन मला लाभले. सगळ्या समाजाला दोन गुणाची आवश्यकता असते त्यातील पहिला गुण म्हणजे परस्पराबद्दल प्रेम ईश्वराच्या इच्छेनें अनेक जाति, अनेक धर्म, अनेक भाषा अशी विविधता निर्माण झाली आहे. त्याची इच्छा असती तर एक च जात, एक च भाषा, एक च धर्म तो निर्माण करू शकला असता. बॉबिलोनची एक गोष्ट आहे. त्यावेळच्या लोकानीं एक खूप उच मनोरा बाधावयास सुरू केला. देव तर स्वर्गात होता तेव्हा या मनोऱ्याबरोबर स्वर्गात देवाकडे जाता येईल असे त्याना वाटले. हल्ली तर अमेरिकेत ५०-५०, ६०-६० मजल्याच्या उच इमारती बाधल्या जातात. अर्थात् त्याचा उद्देश वेगळा असतो. शहरात जमीन मर्यादित असते. सगळ्याना रोजगारासाठी शहरात च यावें लागते म्हणून जागा कमी

असल्यानें ते इमारतीचे मजले चढवीत जातात. अशा तऱ्हेने एकएका घरात २०-२०, २५-२५ हजार लोक राहू शकतात. पण बॅबिलोनचे लोक स्वर्गांत जाण्यासाठी उंच मनोरा बांधीत होते. हा त्यांचा मूर्खपणा पाहून देवाने त्यांचे काम बंद करण्यासाठी एक युक्ति योजिली. ती म्हणजे एका भाषेऐवजी त्या लोकांत अनेक भाषा निर्माण केल्या. कोणी एकानें दुसऱ्याला वीटा आण म्हणून सांगितलें तर तो चुना घेऊन गेला. आणि चुना आणावयास सांगितल्यावर त्याने दुसरे च काही तरी आणलें. अशा प्रकारे भाषेचा घोटाळा झाल्यामुळें मनोरा बांधणें बंद होऊन गेले. या गोष्टीचे तात्पर्य एवढें च कीं परमेश्वराच्या इच्छेनें च या वेगवेगळ्या भाषा निर्माण झाल्या आहेत असले भेद आणि विविधता कितो हि असली तरी आपण माणूस ह्या नात्यानें एक च आहोत ही गोष्ट आपण समजून घेतली पाहिजे. अनेक धर्म, अनेक पंथ, अनेक भाषा, अनेक जाति, अनेक पक्ष असले तरी असोत. जगातील सर्व मानव एक आहेत. सगळे परिवार एक परिवार आहेत. या गोष्टीचे ज्ञान करून घेतलें पाहिजे. याचे नाव च प्रेम आहे. हें प्रेम ईश्वराने आम्हाला सगळ्यांना दिलें आहे. विविधतेमधून च विकास होणार आहे

## प्रेमाच्या विस्तारानें च निर्भयता येईल

समाजात ज्या दुसऱ्या गुणाची आवश्यकता आहे तो गुण म्हणजे निर्भयता. प्रेमाचा विस्तार झाल्यावर भय राहू च शकत नाहीं. या उलट जोपर्यंत भय आहे तोपर्यंत खरे प्रेम च असत नाहीं. भीति आणि प्रीति या परस्पर विरुद्ध वस्तु आहेत. या दोन वस्तु एकत्र राहूं शकत नाहींत. बहुसंख्य लोकांचे अल्पसंख्यांकांना भय वाटतें कीं, बहुसंख्य लोक आपणांला दाबून टाकतील. पण जे निर्भय असतात ते अशा कोणत्या हि कारणानें भिणार नाहींत. त्याप्रमाणें कोणाला भय हि दाखविणार नाहींत. जे लोक दुसऱ्यांना भय दाखवून दाबून ठेवतात त्यांचा भयावर विश्वास आहे असें नक्की समजावें त्यांना त्यांच्यापेक्षां अधिक मोठा शक्तिशाली प्रतिस्पर्धी भेटला तर त्याच्यापुढें भिऊन वागतात. अशा लोकांना खरें निर्भय म्हणता येणार नाहीं ते भित्र च होत. कुटुंबामधें जशी प्रीति

असते आणि बालकाची निर्भयता हि असते तशी च समाजामध्यें हि प्रीतिबरोबर च निर्भयता आणली पाहिजे. तेव्हा च सगळ्या गावाचें एक मन, एक हृदय आणि एक कुटुंब होईल. समाजामध्यें स्त्री पुरुष, बालवृद्ध ज्ञानी-अज्ञानी, दुर्बळ-सबळ, हिन्दु–मुसलमान अशी कितो विविधता असली तरी त्यात विरोधिता असू नये. समजा एखाद्या कुटुंबात मोठ्या मुलाला एक रुपया मजुरी मिळते, दुसऱ्या मुलाला बारा आणे आणि तिसऱ्याला आठ आणे व चौथ्यास चार आणे मिळते आणि बाप म्हातारा असल्यानें त्याला काही च मजुरी मिळू शकत नाही. आता या परिवारात मोठ्या मुलाला एक रुपयाचा खुराक, दुसऱ्याला बारा आण्याचा, तिसऱ्याला आठ आण्याचा आणि चौथ्याला चार आण्याचा द्यावयाचा काय ? आणि म्हतारा बाप रोजगार मिळवीत नाही म्हणून त्याला उपाशी च ठेवावयचें काय ? कुटुंबात असें कधी होतें काय ? कधी हि नाही. ते सर्व बरोबर बसून जरूरीप्रमाणे खातात. याला च प्रेमाचा नियम म्हणतात. म्हणून च कुटुंबात शांति असते. ही प्रेमाची नीति समाजात चालू केली पाहिजे तेव्हा च समाजात शांतीची स्थापना होईल.

या विज्ञान-युगात कुटुंबानी मोठें झालें पाहिजे. आता यापुढें लहान कुटुंब राहूं शकणार नाहीत. मोठा पूर आला तर दोन-चार लोक काय करू शकतील ? अशा संकटात ५-७ गावाना हि एकत्र यावें लागतें. एवढें च काय पूरनियंत्रणासाठी ३-४ राष्ट्राच्या सहकार्याची हि जरूरी पडेल. ब्रह्मपुत्रा नदी राष्ट्रभेद जाणत नाही. तिला जर नियंत्रित करावयाचें असेल तर आम्ही राष्ट्रभेद विसरून दोन तीन राष्ट्रें एकत्रित झालो तर च तिचे नियंत्रण करता येईल. या विज्ञानाच्या युगात लहान लहान व्यवस्था चालणार नाहीत. तसें च लहान लहान परिवार हि चालणार नाहीत. आता लहान लहान राष्ट्रें देखील वेगळी टिकू शकत नाहीत, तेथें लहान लहान परिवार कसे टिकू शकतील ?

भूदानाचा उद्देश काय असें काही तरुणानी मला आज विचारलें. गेली ११॥ वर्षें थंडी, ऊन, पाऊस, पूर यामध्यें रोज रोज नवीन नवीन गावी फिरण्याची बाबाला काय जरूरी आहे ? हृदयाशी हृदय जोडणें एवढा च

बाबाचा उद्देश आहे. कोणी म्हणतात मी भूदान मागून जमीनीचे तुकडे करीत आहे, त्यामुळें शेतीच्या अडचणी वाढतील. परतु जमीनीचे तुकडे व्हावे असे मी मुळी च इच्छीत नाही. माझी तर इच्छा आहे की, सगळी जमीन एकत्र करून सहकार्याने सर्वांनी एकत्र शेती करावी. हृदयाचे तुकडे झाले आहेत ते जुळले जावेत ही च माझी इच्छा आहे. कुराणाच्या भाषेत मी 'वस्ल' साठी आलो आहे. आणि तो 'वस्ल' म्हणजे हृदयाला हृदय जोडणें हा होय. आणि अशी हृदयें जोडली म्हणजे जमीनीचे तुकडे जोडणे हि सहज होऊन जाईल. जे लोक हे काम करतील ते देवाचे तसे च लोकाचे आवडते होतील हा माझा स्वतःचा अनुभव आहे हे काम न करता मी जर लोकात भेद पाडीत झगडे उत्पन्न करीत फिरत असतो तर पाक सरकारनें मला या देशात येऊ दिले नसते आणि परवानगी मागण्याचे साहस हि मी करू शकलों नसतो

## अवयव मिळून जसा देह होतो त्या प्रमाणें समाजाचे विभाग म्हणजे समाजाचा देह

या देशात जमीन थोडी आहे जगातल्या अनेक देशांत जमीन कमी आहे म्हणून उत्पादन वाढविण्यासाठी विज्ञानाचे साहाय्य घेतले पाहिजे. केवळ भूदानानें सर्व काम होणार नाही त्या च बरोबर चरखा वगैरे ग्रामोद्योग चालविले पाहिजेत गावात तेलघाणे सुरू केले पाहिजेत आणि तें तेल गांववाल्यानी वापरले पाहिजे परतु तेलाची किंमत जास्त म्हणून गावचा चांभार ते घेत नाही. तो डाक्याहून स्वस्त तेल आणतो चांभार जोडा तयार करतो तो तेली खरेदी करीत नाही. तो बाटाचा स्वस्त कॅम्बी जोडा विकत घेतो. गांवचा चांभार गावच्या तेलाला वाचवू इच्छित नाहीं. समजा आठ आणे जास्त देऊन गावच्या तेल्यानें गांवच्या चांभाराचा जोडा खरेदी केला आणि गावच्या चांभारानें एक रुपया जास्त देऊन गावांत तयार झालेले तेल विकत घेतले तर काय होईल ? बारकाईनें पाहिले तर कोणाचे च नुकसान नाहीं. उलट गांवाला मात्र लाभ होईल. तेलाचा पैसा, जोड्याचा पैसा दोन्ही गावात च राहतील. फक्त थोडी देवघेव होईल एवढें च.

फुटबॉल किंवा हॉकी खेळताना तुम्ही कधी पाहिले आहे काय ? खेळताना चेंडू कोणाकडे आला तर तो आपल्याजवळ च दाबून ठेवीत नाही चेंडू आपल्याकडे आल्याबरोबर तो लागली च दुसऱ्याकडे भिरकावतो. त्याप्रमाणे गावामध्यें पैसा हि एकाच्या हातातून दुसऱ्याच्या हातात सारखा जात येत राहिला पाहिजे तेव्हा च गावामध्यें जीवनाचा सचार होईल माझ्या हातात कोणी रसगुल्ला दिला आणि माझा हात जर तो सारखा आपल्या मुठींत च धरून बसला तर काय होईल ? रसगुल्ला खाल्ल्याचे समाधान मिळणार नाही आणि रसगुल्ला हातांत सडून दुर्गंधी येऊ लागेल हातानें तो रसगुल्ला तोंडात टाकला आणि तोंड स्वार्थामुळें जर तो रसगुल्ला तोंडात च धरून बसले तर तोंडात व्याधि उत्पन्न होईल पण तोंडानें त्याला पोटात ढकलला, पण त्या मूर्ख पोटानें स्वार्थपर होऊन पोटात च रसगुल्ला साठवून ठेवायचा विचार केला तर रसगुल्ला पोटात नासेल, पोटात व्रण होतील आणि आपरेशन करावे लागेल पण पोटाला अक्कल असेल तर रसगुल्ला पचवून त्याचे रक्त करील आणि त्या रक्तामुळें शरीराला पुष्टी मिळेल समाज हि शरीरासारखा आहे प्रत्येक व्यक्ति दुसऱ्याशी जोडलेली आहे शरीराप्रमाणे च समाज हि जेव्हा वागू लागेल तेव्हा तो जिवत होऊन उठेल

एक मुलगा रडत होता त्याला विचारलें तुझ्या डोळ्यातून पाणी का येत ? तो म्हणाला माझा कान फार ठणकतो आहे मी त्याला म्हणालो मोठी च आश्चर्याची गोष्ट आहे कानदुखतो आणि डोळा रडतो ! ते ऐकून त्या दुखात हि त्याला हसू आले समाजाच्या विविध अगामध्यें असेच सबध असेल पाहिजेत आम्ही रोज सात आठ मैल चालतो. कित्येक वेळा चिखलातून वाईट रस्त्यातून चालावे लागते अशा रस्त्यातून मी शरीराला वाहून नेणार नाही असे पाय जर म्हणू लागतील तर काय होईल ? मग बाबाची यात्रा पुढें काही चालणार नाहीं पण पायाला तशी दुर्बुद्धि होत नाही कारण त्याना माहित आहे की बाबा रोज यात्रा सपल्यावर दोन हातानी पाय धुऊन पुसून काढतो, चोळतो, आणि गरम पाण्यानें धुऊन त्याना आराम देतो त्यामुळें दोन हाताची सेवा लाभल्या-

बरोबर पाय खुश होऊन जातात. समाजात जेव्हा परस्परामध्ये अशी प्रेमाची समवेदना सहयोगिता येईल तेव्हा समाजात हि देहाप्रमाणे जीवन-सचार होईल आणि तेव्हा च समाजाची सर्वांगीण उन्नति होईल, समाजात भय राहणार नाही. गावची सर्व जमीन एकत्र होईल तेव्हा सर्व गाव एका कुटुंबाप्रमाणे प्रेमानें जोडलेले, जिवत आणि सुखी होईल.

सभेनंतर नित्याप्रमाणे मौनप्रार्थना झाली. विनोबाच्या सागण्याप्रमाणे सर्वजण शात स्तब्ध होऊन बसले होते. एवढ्यात पाऊस आला. लोक गडबडीनें उठू लागले त्यानीं छत्र्या उघडल्या पण लगे च पाऊस थाबला. तेव्हा बाबा म्हणाले, एवढ्यात बारीकशा पावसानें तुमच्यांत गडबड उडाली. प्रार्थनेसाठी शात होऊन बसू शकला नाही पाउस म्हणजे देवाच्या आशीर्वादाची वृष्टि. काही असो. आता पाऊस थाबला आहे. पुन्हा शात होऊन मौन ठेवून पुन्हा बसा. आज फक्त एक मिनिट च मौनप्रार्थना होईल.

त्याप्रमाणे जनता शात होऊन बसली. दोन मिनिटानी 'सर्वांना प्रणाम जयजगत्' असे म्हणून मचावरून विनोबा निघून गेले.

सब डिव्हिजनल ऑफिसर हिव याना सीमेवर जावयाचे होतें म्हणून त्याना विनोबाचा लवकर निरोप घ्यावयाचा होता. वर्तमानपत्रवर्ते आणि फोटोग्राफर याना हि त्याच्या बरोबर जाण्याची इच्छा होती. एस. डी. ओ. साहेब आणि इतर सरकारी ऑफिसर याना विनोबाना निरोप देण्याच्या व्यवस्थेसाठी जावयाचे होतें. त्याना पदयात्रीदलासह सर्वांबरोबर बाबाचा फोटो काढावयाचा होता. बाबानी त्याला मान्यता दिली. पदयात्री लोक, एस. डी. ओ साहेब आणि जे वर्तमानपत्रवर्ते उपस्थित होते त्या सर्वांचा एक फोटो सरकारी फोटो-ग्राफरने काढला.

रात्रीच्या प्रार्थनेपूर्वी विरयेक सरकारी सिक्युरिटी ऑफिसर निरोप घेण्यासाठीं आले. त्याची ड्युटी सपली होती. आता ते रात्री थाबणार नव्हते. बाबांनी आगत्यपूर्वक त्याच्याशी हस्तांदोलन करून त्यांना निरोप दिला.

# निरोप

[२१ सप्टेंबर. विरळ ते भारत-पाक सीमा, अंतर ६॥ मैल.]

आज पहाटे एक वाजता च जाग आली. तेव्हा च उठलो. शौच-मुखमार्जन व व्यक्तिगत प्रार्थना आटपून घेतली सर्वांना उठवून सामान-सुमान बांधावयास सांगितले बैलगाडीला निरोप पाठविला. दोन वाजता पाऊस सुरू झाला. बाबा हि उठले सर्वजण यात्रेची तयारी करू लागले पण पाऊस थांबेना बैलगाड्या हि येईनात यात्रा सुरू व्हावयास उशीर होऊ लागला तेव्हा बाबाना म्हणालो पावसाची आम्हाला फिकिर नाही पण गाडीवानाना वाटत असावे की असल्या पावसात हे लोक कोठून निघणार ? म्हणून गाडीवान कोठें तरी झोपून गेले असावेत. काही असो तीन वाजता पावसाचा जोर कमी झाला आणि बैलगाडी आली. बाबा आणि त्यांचे पदयात्री यांचे सामान गुंडाळण्यात आले. सामान घेऊन एका मोकळया गाडीतून विश्वभाई निघून गेले. साडेतीन वाजले होते. पाऊस हि थांबला होता. निघण्यासाठी बाबा तयार झाले. मी त्यांना थोडें बसावयास सांगितले रंजन भाईनी "जाबार आगे रागीये दिये जाओ" हे गाणे म्हटले. कल्पनेने आपले लिखाणहि वाचले माझ्या मनात काही बोलण्याची इच्छा होती परंतु मन अस्वस्थ झाल्यामुळें तोंडातून शब्द निघाला नाही म्हणून मूकपणे बाबाना प्रणाम करून उठलो. नंतर सर्वांनी बाबाना प्रणाम केले त्याना बाबानी आशीर्वाद दिला आणि यात्रा सुरू झाली. घरातून बाहेर पडताना परत जोरात पाऊस सुरू झाला पूर्व पाकिस्तानात प्रवेश झाला त्या पहिल्या दिवशी मुक्कामाच्या ठिकाणी पोहोचण्यापूर्वी पावसाने बाबांचे स्वागत केलें होते. आज शेवटच्या केंद्रातून निरोप देण्याच्या समयी हि पावसाने आपल्या आशीर्वादाचा वर्षाव करून बाबाना निरोप दिला.

## अद्भुत संस्मरणीय अनुभव

चिखलातून चालताना मी बरा च मागें पडलों. दोन वेळा पडण्याचा हि प्रसंग आला होता आमच्या आश्रमातील कार्यकर्ता साधुबाबा त्याला

कदिल घेऊन भराभरा चालावयास सांगितले. सुमारे अर्ध्या तासाने पाऊस थांबला परंतु एवढ्या पावसाने हि रस्त्यात चिखल झाला होता आणि पाय घसरत होते या चिखलात चालताना आशादेवींना फार कष्ट होत होते. त्या एकदा पडल्या देखील सुहासिनी देवी आणि अजीत भाई यांनी त्यांचे हात धरले आणि चालावयास मदत केली. कालींदी देवी हि त्यांच्याबरोबर च होत्या वीरेन् भाई, साधुबावा, मी, अजीतभाई, आशादेवी, सुहासिनीदेवी आणि कालींदीदेवी आम्ही पदयात्री दलाच्या बरे च मागे पडलो. बाबा तर जयविजयाच्या बरोबर बऱ्या च वेगानें चालले होते. कल्पना कदिल घेऊन रस्ता दाखवीत पुढें चालली होती. पोलीस अधिकारी हि जलदीनें चालत होते कयासुलभाई, केशवभाई हे त्यांच्याबरोबर च होते. पाऊस येवो वादळ होवो, रस्त्यात चिखल असो, वाटेंत नदी आड येवो तरी देखील बाबांची यात्रा कधी अडली नाही असले अद्भुत सस्मरणीय अनुभव सर्वांना आले असले तरी या आनंदपूर्ण अनुभवाचा आम्हास लाभ झाला. आम्ही मागच्या पार्टीतील लोक नदीपाशी येऊन पोहोंचलो तेव्हा ऐकले की, बाबा छातीइतक्या पाण्यातून पुढें नदी पार करून गेले आहेत त्यांच्याबरोबर च पदयात्रेतील लोक आणि सरकारी सिक्युरिटी ऑफीसर हि चालत किंवा पोहत नदीपलीकडे गेले आहेत नंतर समजले की बाबा नदीजवळ पोहोंचले तेव्हा नावाड्याला हाका मारण्यात आल्या. बाबांनी पाणी किती आहे असे विचारले कोणी म्हणाले पाणी फार खोल नाही माडयाएवढें असावें. तें ऐकता च बाबांनी चालावयास सुरवात केली परंतु नदीचें पाणी छातीपर्यंत चढले. परिणामी, कल्पनादेवी कदिल डोक्यावर धरून पलिकडे गेल्या. झरणा तर ठेंगु असल्यामुळें गळ्यापर्यंत भिजली. पाण्यातून जाता येईल असें ज्याने सांगितले होतें त्याच म्हणणें एकप्रकारे खरे होते पण किती खोल पाण्यातून जावे लागेल हे त्याने सांगितले नव्हतें.

आमची मात्र अशी दशा झाली नाही. आम्ही पोहोंचलो तेव्हा नावाडी नाव घेऊन तयार होता. आम्ही आरामात नदीपलीकडे गेलो. एवढ्यात विरेनभाई हि सामानाची बैलगाडी घेऊन घाटावर पोहोंचले. नावेतून बैलगाडी नेता येण्यासारखी नव्हती. सामान भिजण्याचा संभव होता म्हणून

विश्वभाईच्या मदतीला वीरेनभाई आणि मकू याना मार्गे ठेवले. आता पाऊस थांबला होता पण आकाश मात्र भरलेले होते. कालीदीदेवी बऱ्या च वेगाने चालली होती. ती म्हणाली बाबाना लवकर जाऊन गाठले पाहिजे. आता महत्त्वाचे भाषण ऐकावयास मिळेल, तेव्हा चला. 'मी हि तुमच्या-बरोबर येतो' असे म्हणून आम्ही वेगाने निघालो सुमारे २५ मिनिटे असे चालल्यावर दूर एका ठिकाणी बाबा आपल्या यात्रीदलासह हसत उभे राहिलेले दिसले. माझ्याकडे पाहून हसून म्हणाले 'तुम्ही कसे नदीपार करून आलात हे जाणण्यासाठी आम्ही उभे आहोत मी उत्तर दिले 'आम्ही नावेतून आलो आपल्यासारखे पोहत नाही' तेव्हा बाबा हसले. बाबाचे दूध घेऊन झाले होते. यात्रा पुन्हा सुरू झाली आता गर्दी खूप वाढू लागली होती. चिखलापाण्याची परवा न करता गावातून लोक येत च होते. वारा जोराने वाहत होता. मी, कालीदी देवी, शरणा बाबाच्या थोडे पुढे चालत होतो. आणि कालीदीकडून बाबाच्या गोष्टी ऐकत होतो इतक्यात लांबवर सीमा दिसू लागली. रेल्वेलाईनच्या बाजूनें सीमेच्या अगदी जवळ येऊन पोहोचलो तेथून सीमा सुमार अर्ध्या फर्लांगवर होती. आता लोकाची गर्दी खूप च वाढू लागली. पलीकडचे लोक हि येऊ लागल्यामुळें गर्दीला पार उरला नाही. देशी, परदेशी फोटोग्राफर याचे एवढ्यात आक्रमण झाले. रेल्वेलाइननें रस्ता अरुंद होता यामुळें चालणाराची साखळी मोडून गेली होती पाक-सीमेवर जें तोरण बांधले होतें तेथें पोहोचलों तेव्हा त्या ठिकाणी दीनाज-पूरचे डेप्युटी कमिशनर, पोलीस अधिकारी, एस्. डी. ओ. साहेब, आणि डाका येथील भारतीय हायकमिश्नर आणि त्याचे जोडीदार इत्यादि लोक उपस्थित होते. दीनाजपूरच्या डेप्युटी कमिश्नरनें बाबाशी हस्तांदोलन करून निरोपाचे भाषण केले. मी मात्र लोकाच्या गर्दीमुळें पार्टीतून दूर फेंकला गेलो. त्या गर्दीत विनोबाजी कोठें आहेत हें हि मला दिसेना. चौकशी करताना त्रिकडे प्लॅटफॉर्मवर बाबा उभे आहेत असे एकानें सांगितले. तेव्हा मनात आले गर्दीतून वाट काढून आता जर पुढें गेला नाही तर विनोबाचे पुन्हा दर्शन होणार नाही. म्हणून वरा च जोर करून गर्दीतून पुढें घुसलो आणि उडी मारून प्लॅटफॉर्मवर चढलो. तेथून आमचे जोडीदार कोठें आहेत हे पाहू लागलो त्याना हि मी दिसलो. त्याना सर्वांना च जवळ बोलावून घेतले.

असे लिहिले होते. आणि भारताच्या जमानीवर 'जयजगत' आचार्य विनोबाचे स्वागत असे लिहिले होते.

पश्चिम बगालचे मुख्यमत्री श्री प्रफुलचद सेन आणि सर्वोदयनेते श्री. चारूचद्र भडारी यांनी स्वागताचे भाषण केले विनोबाजी आपल्या उत्तरात म्हणाले—

## धन्यवाद

मी पुष्कळ विचार करून च पाकिस्तानातून जाण्याची पाकिस्तान सरकारला परवानगी मागितली होती मला सागण्यास आनद वाटतो की, पाकिस्तान सरकारने मला फार प्रेमाने परवानगी दिली सोळा दिवस पूर्व-पाकिस्तानात आमची पदयात्रा झाली. सरकारकडून यात्रेच्या सुखसोईसाठी फार उत्तम व्यवस्था करण्यात आली होती आमची कोणती हि अव्यवस्था झाली नाही आणि आम्हाला कसले हि कष्ट सोसावे लागले नाहीत. याबद्दल मी पाकिस्तान सरकारचे आणि त्याच्या अधिकाऱ्याचे आभार मानतो. सरकारने आमची व्यवस्था पाहण्यासाठी जे अधिकारी नेमले होते त्याना माझे विशेष धन्यवाद आहेत त्यानी सदासर्वदा जागृत राहून आमच्या सुखसोई पाहण्याची व्यवस्था केली

आमच्याबरोबर या पदयात्रेत पूर्व पाकिस्तानातील जे कार्यकर्ते होते त्याचे हि मला यावेळी स्मरण होत आहे महात्मा गाधी जेव्हा नोआखली येथे गेले तेव्हापासून अत्यत निष्ठेने हे पाकिस्तानची सेवा करीत आहेत आमची पूर्व पाकिस्तानात पदयात्रा चालणार आहे हे ऐकता च सर्वजण धावत आले—आणि गेले १६ दिवस त्यानी अविश्रात परिश्रम करून सेवा केली. त्याना भेटल्याने आम्हाला फार आनद झाला. त्याच्या सेवेचा उल्लेख करून मी य धन्यवाद देऊन जात नाही. मला आशा आहे की ज्या निष्ठेने ते पाकिस्तानची सेवा करीत आहेत तिचा स्पर्श सर्व लोकाच्या अतकरणात होईल.

## ज्या ठिकाणीं तीन नद्यांचा संगम असतो, त्या ठिकाणीं लोकहृदयांत भेद राहू शकत नाहीं

अखेरीस पाकिस्तानच्या जनतेचे स्मरण केल्याशिवाय मला राहवत नाही त्यांचे प्रेम मला लाभेल याविषयी मला पूर्ण विश्वास होता. परंतु कुराणातील गोष्टीप्रमाणे 'इल्मुल् यकीन' अर्थात तो बौद्धिक विश्वास होता पण मी पाकिस्तानात प्रवेश केल्याबरोबर च जनतेच्या हृदयातील प्रेमाचे आणि उत्साहाचे तरंग जोरानें वाहत आहेत याचे प्रत्यक्ष दर्शन झाले

माझ्या कल्पनेप्रमाणे या सोळा दिवसात सव्वा लाख लोकांनी माझें भाषण ऐकले आहे आणि प्रार्थनेच्या वेळी ते मौन पाळून शांतपणे बसले तेव्हांचे दृश्य विलक्षण होतें मी जिवंत असेपर्यंत ते दृश्य मी कधी च विसरणार नाहीं हा जो जनतेच्या प्रेमाचा साक्षात्कार मला झाला त्याला कुराणाच्या भाषेंत 'ऐनुल् यकीन' असे म्हणता येईल याठिकाणी मी तर जनतेकडे प्रेमानें च पाहिले होते आणि मला असा अनुभव आला की, त्याच्यातला च मी एक आहें. सोळा दिवसांत खूप मोठ्या प्रमाणावर आम्ही तेथें भूदान आंदोलन चालवू असे माझ्या मनांत कधी च आले नव्हतें मी केवळ प्रेम दाखविण्याचे चिन्ह म्हणून भूदानाविषयी बोलत असें पहिल्या दिवशीं च जमीन देण्यासाठी एक मुस्लीम बंधु आला आणि त्यानें चार एकरातील एक एकर जमीन दान दिली कुणाला द्यायची त्याचे नांव हि सांगितले आणि वितरण हि होऊन गेलें. जमीन रजिस्टर करण्याचा खर्च हि दात्यानें देण्याचे कबूल केले. मी त्याच्या मांथावर हात ठेवून म्हणालों 'परमेश्वर तुला आशीर्वाद देवो, अशी मी त्याच्या-जवळ प्रार्थना करतो'. त्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. हें पहिल्या दिवसाचे पवित्र दान होतें आणि नंतर रोज कांहीं ना कांही दान मिळत च गेलें अशाप्रकारें १५० बिघ्याहून जास्त जमीन मिळाली अशाप्रकारें मग प्रेमाचें प्रत्यक्ष दर्शन झाले आणि खूप आनंद वाटला.

तुमच्या इथें येण्याचा उद्देश काय वर्तमानपत्रवाल्यांनीं मला विचारलें मी त्यांना सांगितलें माझा उद्देश उत्तम च आहे ज्याठिकाणी

गगा, यमुना आणि मेघना (ब्रह्मपुत्रेला याठिकाणी मेघना नाव दिले आहे) या तीन नद्याचा सगम होतो, अशा या नद्या जिथे राष्ट्रातील भेद मानीत नाहीत त्या ज्या देशातून वाहत जातात त्या देशातील लोकाच्या हृदयात भेद राहू शकत नाही

## बगालचे ऋण चित्तावर कोरले आहे

सर्व भारत फिरुन मी शेवटी बगालमध्ये आलो आहे वग देशाकडून मला लहानपणापासून च प्रेरणा मिळाली आहे बगालच्या महापुरुषाकडून देशसेवेचे बाळकडू मिळाले आहे हे महान् ऋण माझ्या चित्तावर कोरल्यासारखे आहे त्या ऋणातून मी मुक्त होऊ शकणार नाही (एवढे बोलून विनोवा स्तब्ध उभे राहिले, त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या) विनोवा पुन्हा बोलू लागले—या वगभूमीबद्दल माझ्या अत.करणात अत्यत आदर आहे. ज्याठिकाणी महापुरुप जन्माला आले नाहीत असा कोणता च प्रदेश जगात नाही त्याचा माझ्यावर खूप प्रभाव पडला आहे बगालच्या महापुरुपाचा हि पडला आहे अशा प्रदेशाची माझ्या हातून जर काही सेवा झाली तर मी स्वत ला खूप धन्य समजेन

सभास्थानातून निघून जाण्यापूर्वी बाबानी पूर्व पाकिस्तानातील जनतेच्या भावनापूर्ण असलेल्या चेहऱ्याकडे स्मितमुखाने थोडा वेळ पाहिले, त्याना नमस्कार केला आणि ते हळू हळू राधिकापूरकडे चालू लागले

पश्चिम दीनाजपूर येथील मुक्कामाचे ठिकाण राधिकापूर, तिकडे बाबा निघून गेले ते ठिकाण पाक-भारत सीमेपासून १॥ मैलावर होते आम्ही त्याच्याकडे पुष्कळ वेळपर्यंत पाहत उभे होतो पदयात्रा राधिकापूर स्टेशन ओलाडून मोकळ्या मैदानातून चालली होती जनतेचा खूप मोठा प्रवाह त्याच्यामागून जात होता एवढ्यात राधिकापूर स्टेशनवर गाडी आली. ती गाडी आम्ही उभे राहिलो होतो त्या पाकिस्तानच्या सीमेवर उभी राहिली या गाडीने परत 'विरळ' ला जाण्यासाठी आम्ही निघालो वर्तमानपत्राचे वातमीदार, सरकारी अधिकारी, आमच्या पदयात्रेतील लोक, S D. O साहेब असे आम्ही सुमार १०० लोक त्याठिकाणी गाडीत चढलो